


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका


मुखपृष्ठ : विनय सायनेकर, सुप्रिया खारकर
(मुखपृष्ठासंबंधीचे टिपण आवरणपृष्ठ ३वर)

---

**संपादक :** प्र.ना. परांजपे
**संपादन सल्लागार :** अशोक रा. केळकर, गं.ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण
**संपादन-समिती :** प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरध्वनी (०२०) २५६९४६१७
**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२. दूरध्वनी (०२०) २४४८६०१५
**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे ५१.

---

**प्रकाशन : त्रैमासिक;** जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)


---

या अंकाचे मूल्य रु. २५/-

संपादकीय

# मराठीची आजची स्थिती

गेल्या काही वर्षांतील भाषाविषयक प्रश्नांची चर्चा आणि घटना यांच्याकडे लक्ष दिले की मराठी भाषेच्या आजच्या स्थितीचे काहीसे धूसर चित्र समोर येते. मुळात एकविसाव्या शतकामध्ये मराठीच्या विकासाच्या संदर्भात निर्माण झालेले प्रश्न हे केवळ मराठीपुरतेच मर्यादित नाहीत. जागतिकीकरण आणि संगणकयुग यांमुळे सर्वच प्रादेशिक भाषांना एका स्थित्यंतरातून जावे लागत आहे. अनेक भारतीय भाषांना आपले अस्तित्व टिकवून ठेवण्यासाठी इंग्रजीशी झगडावे लागत आहे. या सर्वव्यापी समस्येची जाणीव आपल्या समाजाला आता होऊ लागली आहे. त्यामुळे त्या समस्येची चर्चाही होताना दिसत आहे. मध्यंतरी मुंबईत एशियाटिक सोसायटीतर्फे 'हॅव यू लॉस्ट युवर मदरटंग ?' या विषयावर चर्चासत्र झाले. त्यात विविध भाषांमधील तज्ज्ञांनी भाग घेतला. तरुण पिढी आज मातृभाषेतच व्यवहार करण्याचा आग्रह धरणारी उरलेली नाही. इंग्रजीवर प्रभुत्व मिळवून विश्वनागरिक (ग्लोबल) होण्याकडे तिचा कल आहे; असा सर्वसाधारण सूर चर्चेत दिसला.

या व्यापक पटावर मराठीचा प्रश्न समजून घ्यायला हवा. या प्रश्नाकडे सर्व परिप्रेक्ष्यांतून पाहायला हवे. गेल्या काही वर्षांमध्ये मराठी भाषेच्या विकासाला चालना मिळत असल्याच्या काही खुणाही एकीकडे दिसत आहेत. प्रसारमाध्यमांच्या संख्येत वाढ झाल्यामुळे त्या क्षेत्रात मराठी भाषेला मोठ्या प्रमाणात वाव आहे. ग्रामीण भागांतील नवसाक्षर समूहांचा ओढा मराठीकडे असणे स्वाभाविकच आहे. गेल्या चार-पाच वर्षांमध्ये भाषाविषयक सदर - लेखनाला अनेक नियतकालिकांमध्ये स्थान मिळू लागले आहे. 'ॲग्रोवन' (नाव मराठीत का बरं नाही ?) नामक पहिले कृषिविषयक दैनिक मराठी भाषेत सुरू झाले आहे. दिवाळी अंकांची वैशिष्ट्यपूर्ण मराठी परंपरा यंदा शताब्दीशी येऊन ठेपली आहे. प्रशासकीय सेवेमध्ये मराठी तरुण अलीकडे मोठ्या प्रमाणावर उत्तीर्ण होत असून उत्तीर्ण झालेल्यांपैकी अनेकांनी 'मराठी साहित्य' हा एक ऐच्छिक विषय निवडला होता, असे वृत्त आहे.

'बृहन्महाराष्ट्र' या संकल्पनेत आज जगभरातील मराठी लोकांना समाविष्ट करून घेतले जात आहे. मराठीचा पैस असा वाढत असून मराठी भाषा व साहित्य याबाबत परदेशस्थ मराठी मंडळींचे योगदान लक्षात घेण्याजोगे आहे. जगाला देण्याजोगे असे काही मराठी साहित्यात नक्कीच आहे, असा आत्मविश्वास आपण बाळगायला हरकत

नाही. कारण संत तुकारामांच्या गाथेचा आजवर हिंदी, बंगाली, इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, रशियन, स्पॅनिश आदी भाषांमध्ये अनुवाद झाला असून इ.स.२००२मध्ये श्री. दिलीप धोंडे व सहकारी यांनी तयार केलेल्या संकेतस्थळाला (वेबसाइट) आजवर लाखो लोकांनी भेट दिल्याची नोंद आहे. फक्त प्राचीन मराठी साहित्यातच जागतिक दर्जाचे लेखन होते, असे नाही. डॉ. नरेंद्र जाधव यांच्या 'आमचा बाप आन् आम्ही' या मराठी पुस्तकाचा लेखकाने केलेला 'अनटचबेल्स' हा इंग्रजी अनुवाद अमेरिकेत नुकताच प्रकाशित झाला आहे.

मराठी साहित्य-संस्कृतीचे असे काही अंशी आश्वासक चित्र असले तरी दैनंदिन भाषाव्यवहार आणि शिक्षणव्यवहार यांच्याकडे लक्ष वेधले गेले की मराठीच्या विकासाच्या प्रश्नाचे गांभीर्य जाणवते.

महाराष्ट्रात दैनंदिन भाषाव्यवहारात आणि शासकीय व्यवहारातही राजभाषा मराठीचा ठसा आजही उमटत नाही. 'राजभाषा अधिनियम १९६४'चे काटेकोर पालन करण्याची प्रत्यक्ष कार्यवाही अजूनही झालेली दिसत नाही. पुणे येथील 'समर्थ मराठी संस्थे'च्या प्रयत्नांमुळे 'भारत संचार निगम लिमिटेड'ने पुणे येथील ग्राहकांना दूरध्वनीवरून मिळणारे ध्वनिमुद्रित संदेश प्रथम मराठीत, नंतर हिंदीत आणि त्यानंतर इंग्रजीत ऐकवण्याची व्यवस्था सुरू केली आहे. केंद्र सरकारच्या त्रिभाषासूत्राबाबतच्या नियमाची अंमलबजावणी त्यामुळे होऊ लागली आहे. सनदशीर मार्गाने मराठीच्या विकासाचे असे प्रयत्न महाराष्ट्रात सर्वदूर होणे गरजेचे आहे. राज्य मराठी विकास संस्था यात पुढाकार घेऊ शकते.

आज शिक्षणव्यवहारात मराठीचे स्थान काय आहे, यावरून मराठीचे भवितव्य ठरते. तेथेही काळजी करण्याजोगीच परिस्थिती आहे. मराठी माध्यमांच्या शाळांचे कमी होणारे प्रमाण व मराठीच्या विद्यार्थ्यांची घसरणारी टक्केवारी हा काळजीचाच विषय आहे. दहावी व बारावीच्या महाराष्ट्र राज्य शिक्षण मंडळाच्या परीक्षेत मराठी विषयात अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांशी वाढती संख्याही मराठीच्या अध्यापनाबाबत मुळापासून चिकित्सा करायला भाग पाडणारी आहे. नुकतेच पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाच्या पुढाकाराने आयोजित केलेल्या एका चर्चासत्रात याबाबत विचारमंथन झाले.

त्याच सुमारास केंद्रीय माध्यमिक शिक्षणमंडळाने (सीबीएसई) विद्यार्थ्यांच्या शुद्धलेखनातील चुका क्षम्य मानण्याचा निर्णय घेतला. वास्तविक 'शुद्धलेखन' हा शब्दप्रयोग न वापरणे योग्य होईल. त्यातून शुद्ध-अशुद्ध असा भेद निर्माण होऊन वारे वेगळ्याच दिशेने वाहतात ! खरा प्रश्न आहे तो नियमानुसारी लेखनाचा ! आता 'द्रौपदीने श्रीकृष्णाचा धावा केला' हे वाक्य काही विद्यार्थी 'द्रौपदीने श्रीकृष्णाचा दहावा

केला', असेही लिहितात. हे बरोबर द्यायचे का ? कोणत्याही विषयाची एक अंतर्गत नियमप्रणाली असतेच. त्या त्या विषयाचे अध्ययन करताना ती नियमप्रणाली विद्यार्थ्यांना स्वीकारावीच लागते. मग भाषेबाबतच नियमांबाबत सवलत मागण्याची भूमिका कितपत योग्य ठरते ? भाषा ही एक सामाजिक संस्था असल्यामुळे त्या नियमांची कालानुरूप फेरतपासणी करावी, त्यांत इष्ट ते बदल करावेत, ही मागणी रास्त आहे. सारासार विचार करून त्याबाबत धोरण ठरवता येईल. पण नियमांना न जुमानण्याची वृत्ती कशी काय समर्थनीय ठरेल ? उलट त्यामुळे उत्तम भाषिक कौशल्ये संपादन करण्यापासून विद्यार्थी परावृत्त होण्याचा धोका संभवतो !

या पार्श्वभूमीवर मराठीच्या शिक्षणव्यवहारात काही नव्या वाटा शोधण्याचा प्रयत्न करायला हवा. केंद्रीय माध्यमिक शिक्षणमंडळातील विद्यार्थ्यांनाही तीन भाषा अनिवार्य कराव्यात व महाराष्ट्रामध्ये त्यात मराठीचा समावेश करावा, असे आवाहन राज्यसभेत करण्यात आले आहे. त्याचा पाठपुरावा करायला हवा. महाराष्ट्रात सर्वच शाळांमध्ये (एकही अपवाद नको !) पहिलीपासून मराठी शिकवणे सुरू व्हायला हवे !

शालेय व महाविद्यालयीन पातळीवर मिळणाऱ्या भाषाशिक्षणातून पुढील जीवनात भाषाव्यवहार करण्याची पात्रता विद्यार्थ्यांमध्ये पुरेशा प्रमाणात येत नाही, ही वस्तुस्थिती आहे. त्यामुळे आपल्या विद्यार्थ्यांना भाषाशिक्षणामुळे जीवन-व्यवहाराचे ऐलतीर गाठत येत नाही; मग सांस्कृतिक समृद्धीचे पैलतीर गाठणे तर दूरच ! त्यासाठी खरे तर उच्च माध्यमिक पातळीपासून 'भाषालक्ष्यी अभ्यासक्रम' व 'साहित्यलक्ष्यी अभ्यासक्रम' असे मराठीचे दोन स्वतंत्र अभ्यासक्रम शिकवण्याची सोय उपलब्ध व्हायला हवी. महाराष्ट्रात स्थायिक झालेल्या अमराठी मंडळींना मराठीतून जीवनव्यवहार करता येणे शक्य व्हावे, यासाठी मराठी (मूलभूत /व्यावहारिक) अभ्यासक्रम शिकवण्याची सोयही व्हायला हवी. उच्च माध्यमिक स्तरावर हा अभ्यासक्रम सुरू केल्यास महाराष्ट्रात इतर प्रांतांतून शिकायला येणाऱ्या विद्यार्थ्यांना या अभ्यासक्रमाचा लाभ घेता येईल.

भावी काळात मराठी भाषकाने बहुभाषिक होण्याची गरज असल्याचे विचारवंतांचे प्रतिपादन आहे. ते रास्तच आहे. मात्र त्या प्रक्रियेत स्वत:ची भाषिक ओळख विसरून जाणे उपयोगी नाही. स्वत:ची भाषा गवसणे, ही आत्मविश्वासासाठी आवश्यक अशी पहिली पायरी आहे. अलीकडे अनेक व्यक्ती व स्वयंसेवी संस्था मराठीच्या विकासासाठी झटत आहेत. मराठीच्या विकासासाठी आवश्यक असे जनजागरणाचे प्रयत्न थोड्याफार प्रमाणात दिसू लागले आहेत. त्यातून तयार होणारी चेतना कृतिशील प्रयत्नांकडे वळवण्याचे आव्हान आज आपणा समस्त मराठी-प्रेमींसमोर आहे. ■

नीलिमा गुंडी

# भावकाव्यात्मता आणि विश्ववात्सल्य

डॉ. द. भि. कुलकर्णी

अस्मिताशी फोनवरून बोलत होतो; म्हटलं, ''अस्मिता, तू म्हणतेस तो साहित्यिक खरोखरच मोठा साहित्यिक आहे; माझा आवडताही आहे; भाषेची त्याला सिद्धीच प्राप्त झाली आहे; त्याचे अनुभवच भाषांकित असतात - तो मोठाच साहित्यिक आहे; पण महान साहित्यिक नाही.''

''महान आणि मोठा यांत काय फरक आहे ?'' - अस्मिता.

तिला वाटलं असावं, मी रस, लय, वास्तवता, विद्रोह असं काही बोलेन; नाही, माझ्या मनात दुसरेच दोन शब्द आलेत : लिरिकल क्वालिटी आणि विश्ववात्सल्य.

खूपदा आपल्याला वाटतं, लि. क्वा. म्हणजे काहीतरी रोमँटिक, नादमधुर. नादमधुरता हा अभिव्यक्तीचा गुण असतो, रोमँटिकपणा ही भूमिका असते. लि. क्वा. म्हणजे एवढेच असेल तर मग तिची काय मातब्बरी ! – तिच्यामुळे वाङ्मय महान होईलच कसे ? गळ्यात गळा घालणाऱ्या शब्दांची माळ गुंफली आणि जगाकडे हुरहुरत्या नजरेने पाहिल्याने लटके वाङ्मय निर्माण होईल; महान वाङ्मय कधीच निर्माण होणार नाही; होईल ? अनेक गीतकारांची गीते आणि अनेक कथाकारांच्या कथा अशाच तर 'रोमँटिक', 'लिरिकल' असतात. त्यांतल्या काही ओळी आपल्या ओठांवर रेंगाळतात, त्यातले काही प्रसंग आपल्या आठवणीत रेंगाळतात म्हणून काय त्यांना उत्तम साहित्य म्हणायचं ? – म्हणतही नाही म्हणा आपण ! दोन घटकेची करमणूक, झालं !

'लायर या वाद्याच्या साथीने गायलं जाणारं गीत', 'रिमोट फ्रॉम एव्हरी-डे लाइफ' ही अप्रासंगिक माहिती सोडा; काय आहे लि.क्वा.' या संज्ञेचा वाङ्मयीन अर्थ ?

'कालमुक्तता' हे लि.क्वा.चे व्यवच्छेदक लक्षण आहे.

अनुभवाचे गतकाळ - सापेक्षतेने महाकाव्यात अवतरण होत असते. म्हणून तर महाकाव्यात इतिहास अंतर्भूत असतो; नाटक तर बोलून चालून आपल्या नजरेसमोरच अनुभव साकार करीत असते - तिथे अनुभवाचे अवतरण वर्तमानसापेक्षतेने होत असते,

हे सांगावयास नकोच; मग भलेही तो अनुभव गतकालीन असो वा भविष्यकालीन असो !

भावकाव्य मात्र अनुभवाला कालमुक्त करीत असते - अर्थात अस्सल भावकाव्य. बालकवी-मर्ढेकर-रेगे-म.म.देशपांडे-चित्रे यांच्या काही कवितांमध्ये अनुभव असा कालमुक्त झालेला दिसेल. अशा कवितांचा चरित्रसापेक्ष, घटनासापेक्ष अभ्यास करणे अनुचित असते. अनुभव कालमुक्त होतो तेव्हा तो घटना-व्यक्ती यांच्यातूनही मुक्त होतो, हे काय सांगायला हवे !

हा भावकाव्यात्म गुणविशेष कलाप्रक्रियेला जास्तीत जास्त न्याय देत असतो : निर्माता संकुचित मीपण त्यागूनच तर निर्मिती करीत असतो; आस्वादक संकुचित मीपण त्यागूनच तर आस्वाद घेत असतो; मग निर्मितीसामग्री-आणि – आस्वादसामग्री कालबद्ध असून चालेलच कशी ? तशी ती असेल तर ती निर्माता – आस्वादक यांनाही कालपरिघात नाही ओढणार ?

कलाप्रक्रियेला भावकाव्य जास्तीज जास्त न्याय देत असते; म्हणून तर भावकाव्यात्म गुणविशेषाची कलाक्षेत्रात विशेष मातब्बरी असते.

अस्मिता, आपणा सर्वांना प्रिय असणाऱ्या त्या साहित्यिकाच्या कोणत्या कलाकृतीमध्ये हा कालमुक्ततेचा कलागुण आढळतो ? सांग.

'कालमुक्त अनुभव' हा कलाकृतीचा गुण तर 'विश्ववात्सल्य' हा कलावंताचा दृष्टिविशेष – असे आपण समजतो; हे दोन विशेष विभक्त आहेत असे समजतो; आपले बोलणे जरा भारदस्त व्हावे म्हणून वर आपण 'विश्वकरुणा' असा शब्द वापरतो – तसे म्हटले की कलावंत एकदम प्रेषिताच्या उंचीवर पोचतो ना !

अहो, प्रेषितापाशी विश्वकरुणा असते तर कलावंतापाशी विश्ववात्सल्य;

–प्रेषित उंच व्यासपीठावरून बोलत असतो तर कलावंत गळामिठी घालत असतो.

राहो भरून आकाश
माझा शेवटचा श्वास
मनामनांत उरावा
फक्त प्रेमाचा सुवास

ही विश्वकरुणा नाही, हे विश्ववात्सल्य आहे. या विश्ववात्सल्याचे विभिन्न गंध टॉलस्टॉय - डोस्टोएव्हस्की-चेकोव्ह, ज्ञानोबा-तुकोबा, मर्ढेकर-जीए, बहिणाबाई- म.म. यांच्या निर्मितीत दर्वळताना दिसतात. ते विधानांतून प्रकटत नाहीत, त्या विश्ववत्सलतेची अनुभूतीच ते आपल्या मनात उद्भूत करतात. असे व्यवहारात कधीच घडत नसते : कालमुक्ततेचा अमूर्त अनुभव व्यवहारात इतका मूर्त कधीच झालेला

नसतो.

इथे भावकाव्यात्मता आणि विश्ववत्सलता हे दोन विशेष एकमेकांत मिसळून जातात : एक निर्मितीविशेष, एक निर्माताविशेष. त्यांच्या संयोगातून जे काही उद्भूत होते त्यालाच आपण 'लावण्य' म्हणतो.

हे विश्ववात्सल्य म्हणजे मांगल्य, भाविकता, भावुकता, भाबडेपणा, शांती, क्रांती यांचे भळभळते, विधानात्मक प्रकटीकरण नसते. भोवतीची माणसेच नव्हेत, तर समग्र अस्तित्वाचा उभा छेद घेतल्यावर त्यात समाविष्ट होणारी बरी-वाईट माणसे, लहान-मोठे पशुपक्षी, उंचनिंच वनस्पती, नसलेली भुतेखेते, असलेले – नसलेले देव-दानव-पूर्वजन्म-पुनर्जन्म या साऱ्यांना तिथे स्थान असते, त्यांना मायाळूपणे गळामिठी तिथे घातलेली असते – निर्मात्याने व म्हणून आस्वादकानेही. यालाच 'विश्वाश्लेषी' असा मोठा शब्द आहे; यालाच 'विश्वमय तरीही विश्वोत्तीर्ण वृत्ती' असे म्हणतात. अशी विश्वमाया त्या साहित्यिकामध्ये दिसते का, अस्मिता ?

भावकाव्यात्मता (कालमुक्तता) आणि विश्ववात्सल्य (सर्वात्मकता) या एकाच परिमळाच्या दोन संज्ञा आहेत - महान साहित्यकृतीचे ते व्यवच्छेदक लक्षण आहे.

■

डीएसके-विश्व, 'वसुधा', ई-००४, ऑफ सिंहगड रोड, धायरी, पुणे ४११०४१.
दूरध्वनी : २४३८०८९४

## बोलणे - ऐकणे

ऐकणं म्हणजे कुणीतरी बोलून दार वाजवल्यानंतर दरवाजा उघडणं... संवादकौशल्य म्हटलं की आपण बोलण्याच्या कौशल्याला नुसते डोक्यावर चढवून ठेवतो. संवादकौशल्य दुहेरी असतं याचा जवळजवळ विसरच पडतो. नुसते शब्द बघितले तरी बोलण्याला लावली जाणारी विशेषणं पहा आणि ऐकण्याची पहा. फाडफाड, अस्खलित, विद्वत्ताप्रचुर, खुसखुशीत, नर्मविनोदी, पाल्हाळीक या यादीशेजारी 'लक्षपूर्वक' एवढं एकच ठळक विशेषण ऐकण्यासाठीचं दिसेल. त्याच्या छटा ओळखणं यातच आपली साधना असते.

**श्यामला वनारसे**

'सुंदराचा वेध लागो' - 'मिळून साऱ्याजणी' पुणे २००५, पृ. ४७ व ५०

# अर्थनिर्धारणाचे पाच आयाम

शैलेश सदाशिव पुंडलीक

सर्वसाधारणपणे अर्थशास्त्राच्या चर्चेमध्ये अर्थाच्या अनेक प्रकारांची चर्चा केलेली आढळते. त्यामध्ये भावपर अर्थ, निर्देशक अर्थ, साहचर्यपर अर्थ, शैलीगत अर्थ असे अनेक प्रकारचे वेगवेगळे अर्थ विचारात घेतलेले असतात (पुंडलीक, १९९९). बऱ्याच वेळा असे दिसते की हे अर्थ केवळ एकाच अर्थाच्या वेगवेगळ्या प्रकारांचे केवळ वर्गीकरण आणि नामीकरण असते. शास्त्रीय दृष्टिकोणातून हे वर्गीकरण आवश्यक आहे हे खरे पण केवळ या दोन प्रक्रियांमध्येच अर्थशास्त्र अडकले तर ते एक एकांगी, वर्गीकरणात्मक आणि अत्यंत बेचव असे शास्त्र होईल. या अर्थाच्या वर्गीकरणामागील तत्त्वे आणि निकष यांचा विचार केल्याशिवाय त्याला स्पष्टीकरणात्मक वैधानिकता येणार नाही. पण ही तत्त्वे आणि निकष यांचा विचार करण्याआधी भाषेच्या सामाजिक पैलूंच्या आधाराने अर्थनिष्पत्तीच्या प्रक्रियेचा विचार करणे आवश्यक आहे - नाहीतर त्यांना योग्य त्या दृष्टिकोणाची चौकट देणे अवघड होईल.

ज्ञानप्रकियेमध्ये भाषाव्यतिरिक्त असणाऱ्या वस्तुमात्रातील (भाषेतीलही अनेक) पदार्थांचे आकलन ज्ञानेंद्रियांच्या साहाय्याने होते आणि मग त्या अनुभवातून निर्माण झालेल्या मानसिक चित्रातील काहींचे रूपांतर प्रतिमा/संकल्पनात करून घेऊन आणि त्यासाठी काही यादृच्छिक पण परंपरामान्य ध्वनी/ध्वनिबंध वापरून शब्द आणि अर्थ यांची सांगड घातली जाते ही प्रक्रिया सर्वमान्य झालेली आहे. पण खऱ्या अर्थाने हा एकांगी विचार असून त्यामध्ये भाषेच्या सामाजिक स्वरूपाचा संदर्भ घेणे आवश्यक आहे. स्वत: सोस्यूर यांनीही भाषेच्या सामाजिक अधिष्ठानाचे महत्त्व ओळखलेले होते. मात्र, भाषेच्या सामाजिक अधिष्ठानाचा विचार करून अर्थशास्त्राची कोणी सर्वांगीण चर्चा केल्याचे माझ्या माहितीत नाही. किंबहुना संरचनावादाच्या ऐन उभारीच्या काळात अर्थशास्त्राचा फार कोणी अभ्यासच केला नाही. नंतर त्याचा अभ्यास करणाऱ्यांचा प्रमुख उद्देश कधी रचनांतरणात्मक व्याकरणाच्या अभ्यासाचा (कॅट्झ १९७२) तर कधी तत्त्वज्ञानाच्या दृष्टिकोणातून भाषेच्या इतर अंगांचा विचार करण्याचा असे (रसेल, विटगेनस्टाईन, राईल, आल्स्टन इ.) त्यांचे स्वरूप होते. अर्थशास्त्राचा अर्थशास्त्र म्हणून अभ्यास आणि त्यातील आधारभूत तत्त्वे, निकष यांचा अभ्यास त्या मानाने फारच थोडा झाला, त्यातही तिच्या सामाजिक बांधिलकीचा मागोवा घेणारे विवेचन फारच अल्प आहे.

भाषेचा विचार भाषा म्हणूनही करायला हवा यावर मतभेद होऊ शकत नाहीत. त्यामुळे एका दृष्टीने पाहता अर्थनिर्धारणाच्या प्रक्रियेत पारंपरिक व्याकरणात मानलेली रूपिम, शब्द, पदबंध (फ्रेज) आणि वाक्य ही एकके - आणि भाषेच्या संवर्गात्मक (पॅरॅडिग्मॅटिक) तसेच रचनाबंधात्मक (सिंटग्मॅटिक) अक्षांवर असणारे शब्दांचे परस्परसंबंध अतिशय महत्त्वाचे आहेत. त्यानुसार शब्दगत अपेक्षा आणि व्याकरणगत अपेक्षा असे अर्थाचे दोन प्रकार होतात. यापैकी व्याकरणाचा अभ्यास विशेषत: रचनांतरणात्मक व्याकरणात फार मोठ्या प्रमाणात झाल्याने त्याचा इथे विशेष विचार करण्याची आवश्यकता नाही. सामाजिक बंधनांनुसार होणाऱ्या अर्थांच्या प्रकारांचीही बरीच चर्चा झालेली आहे; फक्त त्या अर्थांना आधारभूत असणाऱ्या मूलतत्त्वांची फारशी चर्चा झालेली नाही. त्या तत्त्वांची त्रोटक स्वरूपात चर्चा करावी, हा या निबंधाचा उद्देश आहे.

एकंदरीत भाषांतर्गत आणि भाषाबाह्य अशा घटकांची संख्या पाहता शब्दाच्या अर्थाची निष्पत्ती होताना आपण त्यात पाच वेगवेगळ्या प्रकारचे आयाम (मोड्युल्ज) वापरत असतो असे दिसते. याचा अर्थ असा नव्हे की हे आयाम व्यक्तिगत पद्धतीने - इतर कोणत्याही गोष्टींचा संबंध न ठेवता - स्वत:च अर्थनिर्मिती किंवा अर्थनिधारण करतात. प्रत्यक्षात या पाचही प्रक्रिया एकाच वेळेला कार्यान्वित होऊन मगच भाषा व्यवहारातील शब्दांचे अर्थ वापरात येतात. अर्थनिष्पत्तीतील हे पाच आयाम पुढीलप्रमाणे आहेत :

१. **शब्दगत अपेक्षा :** भारतीय अर्थशास्त्रज्ञांनी त्यांच्या चर्चेत मांडलेले अभिधा, लक्षणा आणि व्यंजना हे अर्थ या विचारात येतात. याचेच अनेक प्रकार निरनिराळ्या पुस्तकांमध्ये वर्णन केलेले असतात. त्यामध्ये वर नोंदल्याप्रमाणे निर्देशक अर्थ, साहचर्यपर अर्थ, भावपर अर्थ, शैलीगत अर्थ इत्यादी अनेक प्रकार दिसतात. (धोंगडे १९८२, पुंडलीक १९९९). सर्वसाधारणपणे यातीलच निर्देशपर अर्थ किंवा सर्वमान्य अर्थ हा 'कॅनॉनिकल मीनींग' म्हणून शब्दकोशांमध्ये नमूद केलेला असतो.

२. **व्याकरणगत अपेक्षा :** व्याकरणाचे स्वत:चे अनेक आयाम आहेत. त्यामध्ये 'केस' म्हणजे विभक्ती, क्ष-बार व्याकरण, रचनांतरण, बंधन आणि कैवर्तन (गव्हर्मेण्ट व बाइंडिंग) यांचा समावेश होतो. वाक्यातील शब्द आणि शब्दबंध यांचे एकमेकांशी काही ठरावीक असे व्याकरणिक संबंध असतात. त्यांचे निर्धारण करून हा अर्थ सिद्ध होतो.

३. **प्रॅग्मॅटिक/संभाषण व्यवस्थानुसारी अपेक्षा :** प्रत्यक्ष संभाषणामध्ये भाग घेणाऱ्या व्यक्तींच्या सामाजिक संबंधानुसार त्यांनी एकमेकांशी बोलताना वापरण्याच्या नियमानुसार या प्रकारचा अर्थ निष्पन्न होतो. या प्रकारामधे संभाषण विश्लेषण, ससंदर्भ

विश्लेषण (डिस्कोर्स ॲनॅलिसिस, टेक्स्ट ॲनॅलिसिस), ग्राईस यांनी अधिष्ठित मानलेली तत्त्वे, पूर्वग्रह (प्रीसपोझिशन), तर्कशास्त्रीय निष्कर्ष, भाषाक्रिया उपपत्ती (स्पीच ॲक्ट थिअरी) इत्यादींचा समावेश होतो.

४. **कार्यपर अपेक्षा :** सर्व भाषा-व्यवहारांचे उद्दिष्ट कोणत्या ना कोणत्या स्वरूपाचे कार्य करण्याचे असते. त्यामध्ये याकोबसन (१९६०) यांनी श्रोता - वक्ता, संदर्भ, संपर्क व्यवस्था, भाषा अशा प्रकारचे सहा घटक आणि त्यांना अनुसरून निर्देशक, वैचारिक आप्तसंपर्क, काव्यात्म अशी वेगवेगळी कार्ये मानलेली आहेत. प्रामुख्याने एखादी भाषा प्रथम भाषा किंवा द्वितीय भाषा म्हणून शिकत/ शिकवत असताना या घटकांचा आणि कार्यांचा विचार करणे आवश्यक आहे.

दुसऱ्या एका विचारप्रणालीनुसार भाषेच्या साहाय्याने आमंत्रण देणे/स्वीकारणे, सल्ला देणे/मागणे, माहिती विचारणे/माहिती देणे अशा अनेक प्रकारची कार्ये करता येतात. एखादी भाषा तृतीय भाषा किंवा परकीय भाषा या रूपात शिकायच्या वेळी तिच्या अभ्यासक्रमात या दृष्टिकोणाला महत्त्व येते. या प्रकारच्या अभ्यासाला भाषेचा कार्यात्मक अभ्यास (फंक्शनल ॲनॅलिसिस) असे म्हणतात.

तिसऱ्या एका विचारसरणीप्रमाणे भाषेच्या कार्यांचे उच्चस्तरीय कार्ये आणि निम्नस्तरीय कार्ये असे दोन प्रमुख गट होतात. भाषाद्वित्व किंवा डायग्लॉसिया या घटनेमध्ये या स्वरूपाचा विचार प्रामुख्याने करणे आवश्यक आहे. या सर्वच विचारप्रणालींमध्ये भाषेच्या कार्यांचा अभ्यास केलेला असतो.

खऱ्या अर्थाने, एकाच वस्तूकडे वेगवेगळ्या दृष्टिकोणातून पाहण्याचे हे तीन प्रकार आहेत. त्या सर्वांमधून काही अतिशय उपयुक्त तथ्ये मिळतात म्हणून भाषाशास्त्रज्ञांनी अभ्युपगमाच्या दृष्टीने त्यांचा वेगवेगळा विचार करणे फायद्याचे आहे. परंतु भाषा वापरणाऱ्यांचा संबंध केवळ भाषाव्यवहारापुरताच असल्याने त्यांना हे विश्लेषण फारसे उपयोगाचे नाही. आणि दुसरे म्हणजे भाषा वापरणारे भाषक प्रत्यक्षात त्या सर्व दृष्टिकोणांचा साकल्यानेच भाषाव्यवहारात उपयोगात करतात.

५. **पारंपरिक अपेक्षा :** सर्वसाधारणपणे या आयामाचा विचार अनेकवेळा अर्थशास्त्राच्या पुस्तकांतील चर्चेमध्ये केल्याचे आढळत नाही. हा हवेतील प्राणवायू-सारखा आहे. तो उपलब्ध असताना आपले त्याच्याकडे - बहुधा, अगदी नेहमीच - दुर्लक्ष होते. तो उपलब्ध नसताना मात्र भाषाव्यवहारात अर्थाचा अनर्थ होऊ शकतो; कारण प्रत्यक्ष संदेशनातील अर्थनिर्धारणामध्ये तो एक प्रमुख घटक आहे. श्रोता आणि वक्ता काही ठरावीक सामाजिक परंपरांमध्ये भाषा व्यवहार करत असतात. त्या परंपरांच्या प्रणालीत त्यांच्या काही अर्थसापेक्ष अपेक्षा निर्माण होतात. त्यानुसार त्यांच्या



अनुक्रमणिका

भाषा-प्रयोगांना वेगवेगळ्या स्वरूपाची कलाटणी मिळू शकते. या घटकांचे विश्लेषण पुढे केले आहे.

वर दिलेले पाचही आयाम भाषा-व्यवहारात एकाच वेळेला कार्यरत असतात आणि या सर्वांच्याच संपृक्त आधारावर संभाषणातील भाषेच्या अर्थाची निष्पत्ती आणि त्याच्या आकलनाची प्रक्रिया होते. त्यावरील बंधन फक्त एवढेच आहे की विशिष्ट स्थलकालाच्या चौकटीत त्यातील एकालाच प्राधान्य मिळून त्यानुसार व्यक्त होणारा अर्थ तेवढा सर्वमान्य होतो. या आयामानुसार निर्माण होणाऱ्या अर्थांचे पाच वेगवेगळे प्रकार पडतात असे दिसून येते. : (१) शब्दगत अर्थ (२) वाक्यगत अर्थ (३) परंपरापर अर्थ (४) प्रसंगपर अर्थ (५) कथात्मक अर्थ.

**शब्दगत अर्थ : अभिधा, लक्षणा आणि व्यंजना**

भारतीय अर्थशास्त्रज्ञांनी भाषेला अनुसरून मनुष्याला होणाऱ्या अर्थज्ञानाचे तीन प्रकार मानलेले आहेत. त्यांच्या मते प्रत्येक पदार्थामध्ये अर्थ व्यक्त करण्यासाठी एक स्वतंत्र प्रकारची शक्ती असते. त्यानुसार व्याकरणाच्या परिभाषेत शब्दाने व्यक्त केलेला अर्थ अभिधा = वाच्यार्थ/मुख्यार्थ, लक्षणा = आलंकारिक अर्थ, किंवा व्यंजना = वक्रोक्त/ध्वनित सूचित अर्थ या स्वरूपात व्यक्त होतो. शास्त्रीय परिभाषेत यांचा उल्लेख अनुक्रमाने फक्त अभिधा, लक्षणा आणि व्यंजना एवढाच करण्याची प्रथा आहे. (जिज्ञासूंनी कुंजुन्नी राजा (१९६३) यांनी त्यांच्या पुस्तकात अर्थाचे प्रकार, अर्थव्यक्तीची प्रक्रिया इ० विषयांचा जो सविस्तर उहापोह केलेला आहे तो पाहावा.)

अभिधेने व्यक्त होणारा अर्थ हा त्या शब्दाचा निर्देशक (डिनोटेटिव्ह) अर्थ आहे असे म्हणता येईल. भारतीय अर्थशास्त्रज्ञांच्या संकल्पना आधुनिक काळामधे तशाच्या तशा लागू होतील असे म्हणता येणार नाही. तथापि अभिधा शक्ती आणि जाती या दोन संकल्पनांचा एकत्रित विचार केला तर जाती (क्लास', 'कॉन्सेप्ट', मेंटल पिक्चर') या शब्दाने सिग्निफाईड (सेन्स) या घटकाचा निर्देश होतो आणि अभिधा= योग्यपणे ठेवणे = योग्यपणे व्यक्त करणे म्हणजेच योग्य असा शब्द वापरणे या शक्तीने त्या मानसिक चित्राला शब्दरूप (सिग्निफायर) दिले तर त्यात सोस्यूर याच्या संकल्पनेतील साईन किंवा चिन्ह या स्वरूपातील शब्द उपलब्ध होतो असे म्हणता येईल. या चिन्हाने निर्देशित केलेला अर्थ प्रमाणित अर्थ (कॅनॉनिकल मीनिंग) या स्यरूपाचा असतो. या अर्थाला मानक अर्थ मानून लोक भाषाव्यवहारात त्याचा उपयोग करतात आणि त्याप्रमाणे तो शब्दकोशात नोंदविलेला असतो. (आपण काही वेळा शब्दकोशात शब्दांचे अर्थ पाहून ते वापरतो हा भाग वेगळा पण हा प्रयत्न फारच थोडे लोक करतात. विशेषतः मातृभाषेचा वापर करण्यासाठी शब्दकोश →

भाषाव्यवहार  असा प्रवास सहसा होत नाही.) शब्दाचा हा अर्थ आणि याचे इतर प्रकार यासंबंधी मी अर्थविचार या लेखामध्ये विवेचन केलेले आहे. (पुंडलीक, १९९९) सर्वसाधारणपणे अभिधा या अर्थानेच तो व्यवहारात वापरण्याची पद्धत आहे.

**रूपक आणि सामान्य भाषा : अलंकारनिर्मितीची प्रक्रिया**

लक्षणा ही शब्दार्थाची दुसरी शक्ती आहे आणि त्याप्रमाणे शब्दांचे साहचर्यपर अर्थ मानलेले आहेत. प्रत्यक्षामध्ये लक्षणेने व्यक्त होणारा अर्थ आलंकारिक स्वरूपाचा असतो. अलंकारात वापरल्या जाणाऱ्या प्रतिमा काही नैसर्गिक अर्थांबरोबर/ समाजपरंपरेने आलेल्या एखाद्या संकल्पनेबरोबर साहचर्य दाखवितात. प्रत्यक्षात त्यात असे काही साहचर्य असलेच पाहिजे असे नाही; ब्लॅक (१९६२) यांनी स्पष्ट केल्याप्रमाणे एखादे रूपक आणि त्याला आधारभूत मानलेले साम्य याला वास्तवाचा फारसा आधार असण्याची आवश्यकता नसते. उदा० इंग्लिश लोक घुबड या प्राण्याला शहाणपणाचे प्रतीक मानतात. हाच प्राणी भारतीयांच्या दृष्टीने अशुभ आहे. प्रत्यक्षात या दोन्ही पारंपरिक संकल्पनांना काही वस्तुनिष्ठ आधार असेल असे वाटत नाही. पण तो त्या देशांच्या भिन्न भिन्न संस्कृतींचा, लोकांच्या मानसिकतेचा एक भाग असतो. उदा० तेरा हा आकडा भारतीय नागरिक/भाषा अशुभ मानीत नाहीत; पण पाश्चात्यांमध्ये तो फार अशुभ मानण्याची परंपरा आहे. किंबहुना शब्द आणि अर्थ यांचे मूलभूत साहचर्य हाही त्या त्या देशाच्या पारंपरिक मानसिकतेचाच भाग मानावा असे म्हणायला हरकत नाही. त्यामुळे लक्षणेने व्यक्त होणारा अर्थ वस्तुतः साहचर्यपर नसतानाही तो साहचर्यपर आहे असे म्हणण्याची पद्धत आहे एवढेच.

लक्षणेने एखादा शब्द वापरणे म्हणजे त्याच्या मूळ अर्थापेक्षा काही वेगळ्या अर्थाने तो शब्द वापरणे अशी एक सर्वसाधारण संकल्पना आहे. याला इंग्रजीत डिव्हिएशन फ्रॉम द नॉर्मल मिनींग ऑफ द वर्ड असे म्हणतात. शैलीशास्त्राच्या परिभाषेत त्याला डि-ऑटमायझेशन्, डिज्-ऑटमायझेशन्, फोरग्राउंडिंग् असे म्हणतात. (झुइयाँ १९५४, रिफातेर १९५९, १९६०, पॉस्नेर, १९८२, पुंडलीक १९८९) संस्कृत काव्यशास्त्रज्ञांच्या परिभाषेत त्याला वक्रता असे म्हणतात. याची विशेष चर्चा कुंतकाच्या 'वक्रोक्तिजीवित' या ग्रंथात आढळते. अशा वक्रतेमुळे उपमा, उत्प्रेक्षा, रूपक यांसारखे अलंकार निर्माण होतात. त्यामुळे लक्षणानुसार वापरलेली भाषा ही आलंकारिक भाषा आहे असे आपल्याला वाटणे स्वाभाविक आहे. उदा० काव्य-शास्त्राच्या चर्चेत 'कुंताः प्रविशन्ति' म्हणजे 'भाले प्रवेश करतात' हे लक्षणेचे उदाहरण म्हणून दिले जाते. (प्रत्यक्षात हे रुपितांगाचे उदाहरण आहे. भाले शस्त्रधारी सैनिकांचा निर्देश करतात. त्या अनुषंगाने भाले प्रवेश करतात हे वाक्य वापरून सैनिकांच्या प्रवेशाचा निर्देश

केलेला आहे. पण हीच प्रक्रिया रूपकांमध्येही आढळतेच. उदा० 'मातापित्यांच्या छत्राच्या अभावी ती कोवळी फुले पार वाळून गेली.' या वाक्यातील 'छत्र', 'वाळणे' आणि 'फुले' हे तिन्ही शब्द रूपक म्हणून वापरलेले आहेत.)

वर म्हटल्याप्रमाणे काव्यशास्त्रज्ञांनी अभिधा आणि लक्षणा यांच्या द्वंद्वातून सामान्य भाषा आणि आलंकारिक भाषा/काव्यात्म भाषा यांच्यातील फरक व्यक्त केलेला आहे असे वाटण्याची शक्यता आहे. प्रत्यक्ष व्यवहारात मात्र आलंकारिक भाषा आणि अभिधावाचक भाषा असा फरक करणे अशक्य असते. कारण व्यावहारिक भाषेमध्येही आपण अनेक प्रकारचे अलंकार वापरत असतोच. किंबहुना वापरात असणाऱ्या शब्दातील कोणत्या शब्दाचा उगम आलंकारिक वापरात दिसतो यापेक्षा कोणता शब्द मुळामध्ये अलंकार म्हणून वापरला गेला नव्हता हे सांगणे जास्त अवघड आहे. काँदिया या फ्रेंच तज्ज्ञाने म्हटल्याप्रमाणे संपूर्ण 'ईनीड' या महाकाव्यात जेवढ्या उपमा उत्प्रेक्षा सापडतात त्यापेक्षा कितीतरी जास्त उपमा/उत्प्रेक्षा किंवा इतर अलंकार एका दिवसात मंडईत ऐकू येतात. याचे कारण असे की व्यवहारात वापरण्यात येणारे अनेक शब्द म्हणजे एखाद्या मूळ रूपकाचे अनेक वेळा वापरून झालेले स्वरूप असते, अशा शब्दांना इंग्रजीत 'क्लिशे' असे म्हणण्याची पद्धत आहे.

सुंदर, उच्च अभिव्यक्तीक्षम अशा अलंकारांचे रूपांतर बटबटीत, सामान्य वाच्यार्थ व्यक्त करणाऱ्या शब्दांमध्ये का आणि कसे होते असा प्रश्न इथे निर्माण होऊ शकतो. त्याच्या सर्वच तपशिलांची चर्चा करणे शक्य नाही. कारण त्यातील मानसशास्त्रीय पैलूंचा अभ्यास फारसा झालेला नाही. पण तसे पहायला गेले तर मूळ रूपक किंवा अन्य अलंकारांचे रूपांतर नंतर वाच्यार्थप्रदर्शक शब्दांमध्ये होणे ही प्रक्रिया नवीन तर नाहीच; पण ती भाषाव्यवहारात सतत कार्यरत असते, असे दिसते. सुरुवातीला लक्षणेने वापरलेले शब्द त्यांच्या नावीन्यामुळे श्रोत्यांवर विशेष परिणाम, उदा० नाट्यात्मक किंवा रसनिष्पत्तीकारक, करू शकतात. पण काही काळानंतर ते पुन्हापुन्हा वापरले गेले की त्यातील नावीन्य संपते. त्यामुळे सुरुवातीच्या काळात ते ऐकणाऱ्याच्या मनावर लक्षणीय परिणाम करू शकले असतील तसा परिणाम त्यांना आता साधता येत नाही. शास्त्रीय परिभाषेत असे म्हणता येईल की अलंकार या स्वरूपात एखादा शब्द अनेक वेळा वापरून झाल्यावर त्यातले नावीन्य संपले की त्याच्या अर्थाचे अश्मीभवन होऊन त्याचे अभिधावाचक शब्दात रूपांतर होते.

काही काही रूपके तर अशी आहेत की ती कोणत्या मूळ शब्दांच्या जागी अलंकार म्हणून वापरलेली होती हे सांगणे अशक्य होते. उदा० 'गवताचे पाते' या वाक्प्रचारातील 'पाते' हा शब्द किंवा 'पुस्तकाचे पान'मधील 'पान' हा शब्द रूपक

आहे हे स्पष्ट आहे. पण हे शब्द मराठी भाषकांच्या इतके अंगवळणी पडलेले आहेत की कधीकाळी ते लक्षणेने वापरलेले होते हे मुद्दाम सांगावे लागेल.

या प्रक्रियेत आणि प्रकारांमध्येही काही अतिशय रोचक अशा गोष्टी दिसतात. उदा० काही वेळा शब्दातील वाक्यार्थाचा मूळ रूपकाशी असलेला संबंध शोधणे फारसे अवघड नसते. पण इथेही एकदा तो शब्द वाच्यार्थाने रूढ झाला की त्यातील अलंकारिकतेचा अन्वय पूर्णपणे नाहीसा होतो. उदा० हत्ती हा मराठी शब्द हस्ती या मूळ संस्कृत शब्दावर आधारलेला आहे. अभिधा किंवा वाच्यार्थाने त्याचा उपयोग एका विशिष्ट प्राण्याच्या निर्देशासाठी होतो. तथापि लक्षणेने त्याचा अर्थ 'हात असणारा प्राणी' असा होतो. हत्तीला त्याची सोंड हातासारखी वापरता येते या वस्तुस्थितीमुळे प्राचीन संस्कृत वाङ्मयात त्याचा उल्लेख हस्ती प्राणी = हात असणारा प्राणी असा करण्याची पद्धत होती. पुढे पुढे त्यांच्यातील साहचर्य दृढ झाल्यावर त्यातील प्राणी हा शब्द वगळून त्याचा उल्लेख केवळ 'हस्ती ' असा होऊ लागला. त्यावरून मराठीतील हत्ती हा शब्द तयार झाला.

यातील एक महत्त्वाची गोष्ट अशी आहे की मुळात प्राणी हा शब्दही लक्षणेनेच पूर्वी वापरात होता असे स्पष्ट दिसते. (अन म्हणजे हालचाल करणे, श्वसन करणे या क्रियापदापासून प्राणी म्हणजे हालचाल , श्वसन या क्रिया करू शकणारा तो अशा स्वरूपाचे रूपक त्यात दिसते.) तथापि हस्ती प्राणी हा शब्दप्रयोग होताना त्यातील प्राणी हा शब्द मात्र अभिधावाचक असला तरच ते रूपक अर्थपूर्ण होते. त्यातीलही प्राणी हा शब्द गाळला की 'हस्ती' हे रूपक काही काळ रूपक वापरले तरी काही काळानंतर त्याचे अश्मीभवन होऊन तो शब्दही अभिधा म्हणूनच तयार झाला.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्राणी | → | रूपक/लक्षणा | → | अभिधा |
| हस्ती प्राणी | → | रुपक/लक्षणा | → | अभिधा |
| हस्ती | → | रुपक/लक्षणा | → | अभिधा |

असा हा प्रवास दाखविता येईल.

काही वेळा एखाद्या शब्दातील रूपक हे वस्तुतः रूपक आहे हे कळण्यासाठी त्याच भाषाकुळातील काही दुसऱ्या सहजात (कॉग्नेट) भाषांचा आधार घ्यावा लागतो. मराठीच्या संदर्भात पाहिले तर हिंदी, गुजराती, इंग्लिश, फ्रेंच या तिच्या सहजात भाषा आहेत. एखाद्या शब्दाचे रूप दुसऱ्या भाषेत शोधण्याचे कारण असे की काही काळानंतर एखाद्या शब्दातील रूपक इतक्या वेगाने आणि इतक्या सहजतेने अश्मीभूत होते की अनेक हजार वर्षांच्या त्याच्या उपयोगानंतर त्यात कधीकाळी काही रूपक होते की नाही याची शंका येते. असा शब्द वापरणारे बहुधा त्याला नेहमीच

अभिधास्वरूपात वापरत असावेत असे वाटू लागते. उदा० संस्कृतमध्ये आणि मराठीतही सूर्य हा शब्द त्याच्या अभिधा या शक्तीनुसार वापरलेला आहे.

मुळात सूर्य हे कधीकाळी रूपक होतेच याबद्दल शंका नाही, पण ते कोणत्या अर्थाने वापरले जात असावे हे मराठीत सांगता येणे अवघड/अशक्य आहे. मग ते इतर भाषांच्या साहाय्याने चांगले समजून येते. प्रत्यक्षात 'सु' म्हणजे आकाश. प्रश्न येतो तो 'र्य' या त्याच्या उरलेल्या भागाबद्दल. 'र्य' या ध्वनिबंधाची फोड रय, रीय, लीय अशी करता आली तर त्यातून काही उपयुक्त गोष्टी दिसून येतात.

एक म्हणजे र, ल हे स्वनीम आणि इ, ई, ए हे स्वर आणि य हा अर्धस्वर हे ध्वनी भारतार्य भाषांमध्ये प्रामुख्याने प्रकाश या संकल्पनेसाठी वापरले जातात. (पुंडलीक, २००३; आणि पाहा मरीचि, रश्मि, ज्वल, ज्वर, अर्चि, अंगार, इंगळ इ० विशेष म्हणजे त्यातील ज्वल, ज्वरची तुलना फ्रेंचमधील guerre = इंग्रजीतील war यांच्याशी करा.)

र, ल हे ध्वनी रय, रीय हे ध्वनी विकल्पाने फ्रेंचमधील rire – हसणे या क्रियापदात दिसतात. फ्रेंच, स्पॅनिश भाषांमध्ये सूर्याला जो soleil असा शब्द आहे त्यातही हे ध्वनी आढळून येतात. briller = चमकणे या क्रियापदापासून brilliant हा शब्दही तयार होतो. उपनिषदांमध्ये ज्वालांचे वर्णन करताना त्यांचाही उल्लेख लेलिह्यमानाः (मुंडकः १:२, १:४ ) असा केलेला आहे. किंवा स्फूर्ती देणे, जीवनशक्ती देणे या अर्थानेही 'रेरिवा ' असा शब्द वापरलेला आहे (उदा० अहं वृक्षस्य रेरिवा, तैत्तिरीय १०:१). अशा शब्दांच्या वापराचा इतिहास शोधणे हे फार अवघड पण तितकेच उपयुक्त काम आहे. आणि कदाचित आत्ता त्याचा प्रत्यक्ष इतिहास शोधता आला नाही तरी कदाचित काही काळानंतर तो मिळूही शकेल. तपशीलाचाच एक भाग असा की फ्रेंचमध्येच sourire (उच्चार 'सुरीर') असेही एक क्रियापद आहे, त्याचा अर्थ स्मित करणे असा होतो. या शब्दाची व्युत्पत्ती केवळ फ्रेंचच्या अभ्यासावरून लक्षात येणार नाही; पण त्याचे सूर्य या शब्दाबरोबर असणारे साम्य स्वतःसिद्धच आहे.

याच मालिकेतील एक दुर्लक्षित पण अतिशय महत्त्वाचा शब्द म्हणजे √ लिख, लेख, लिहिणे हा आहे. हा ज्ञानसंवर्धनाचा पर्यायाने प्रकाशाचा, अग्नीचा द्योतक आहे. तो मराठीत केवळ त्याच्या वाच्यार्थानेच वापरलेला दिसतो. त्याच्या अर्थाचे ज्ञान होण्याचे मुख्य कारण म्हणजे अगदी अनपेक्षितपणे तो इंग्रजी, फ्रेंच, लॅटिन या भाषांमध्ये electric (म्हणजे प्रकाशाचा वापर करून लिहिणे )electricity (प्रकाशाचा वापर करून लिहिणारी - वाचणारी सुद्धा ?), lectern , lecturer

या शब्दांत दिसतो. याप्रमाणे प्रकाशाचा, आनंदनिदर्शनाचा, जीवनाचा, शक्तिनिदर्शनाचा, ज्ञानाचा/लेखनाचा/वाचनाचा (पाहा फ्रेंचमध्ये lire = वाचणे) संबंध र हे व्यंजन आणि य हा अर्धस्वर यांच्याशी आहे हे स्पष्ट आहे. या गृहीतांच्या आधाराने आकाशात प्रकाशणारा, स्मित करणारा या अर्थाने सूर्य हा शब्द तयार झाला असावा. मात्र सध्या आपल्याला त्याच्या त्या मूळ अर्थाचा विसर पडलेला आहे.

**भाषाव्यवहारातील रूपकांची रचना :** शब्दगत अर्थामध्ये अभिधा, लक्षण आणि व्यंजना या तीन प्रकारच्या अर्थाचा समावेश होतो असे मानलेले आहे. त्यात दोन प्रमुख प्रकार आढळतात.

(१) मूळ शब्दाच्या अर्थात काही फरक घडून येणे किंवा (२) शब्दाचा अर्थ सर्वसामान्यपणे तोच राहून त्याच्या ध्वनिरूपात काही फरक होणे.

वर स्पष्ट केल्याप्रमाणे अभिधेने व्यक्त केलेला अर्थ आणि लक्षणेने व्यक्त केलेला अर्थ प्रत्यक्षात कोणत्या स्वरूपाचा असावा हे ठरविणे अवघड असते. वर चर्चेस घेतलेल्या हत्ती या शब्दाचा अर्थ प्रथम लक्षणेने निर्धारित झाल्यावर मग अश्मीभवनामुळे तो शब्द अभिधा स्वरूपात वापरता येतो. हाच प्रकार 'दात' या शब्दाच्या बाबतीतही होतो. मूळ संस्कृतमध्ये तो 'दंत' या रूपात दिसतो. लॅटिन, फ्रेंच, इंग्रजी या भाषांमध्ये तो दाँ, डेंट/डेंटल या शब्दांच्या रूपात आढळतो. मुळात तो अदन, अदंत = खाणारा, भक्षण करणारा असा होता; तो √ अद् = खाणे या क्रियापदापासून तयार झाला. नंतर त्यातील सुरुवातीचे अ हे अक्षर लोप पावून सध्या वापरला जाणारा दंत, दात हा शब्द तयार झाला. मूळ शब्दातील अनुस्वार आपण आता मराठीत उच्चारत नाही; पण मराठी लिहिणाऱ्यांनी (आणि बोलणाऱ्यांनीही ) कित्येक वर्षे त्याची स्मृती त्या अनुस्वाराच्या रूपाने राखून ठेवली होती.

शब्दाच्या मूळ अर्थापेक्षा वेगळ्या अर्थाने तो शब्द वापरला - संस्कृत लेखकांच्या परिभाषेत त्यामध्ये काही वक्रता आणली - की रूपक किंवा रूपितांग यांसारख्या अलंकारांची निर्मिती होते. त्यांच्या वापरामुळे काव्यनिष्पत्ती/रसनिष्पत्ती/ सौंदर्यानिष्पत्ती होते असे काव्यशास्त्रज्ञ - आणि इतरही लोक मानतात. प्रत्यक्षात अशी रसनिष्पत्ती नेहमीच होते असे नाही. भाषेचा वापर जेव्हा प्रामुख्याने भाषिक संदेशनासाठीच होतो तेव्हाच रूपकांमुळे सौंदर्यनिर्मिती होते. (पाहा याकोब्सन, १९६०) हा विषय शैलीविज्ञानाचा असल्याने त्याची इथे चर्चा करता येत नाही; पण शैलीशास्त्र काय किंवा अर्थशास्त्र काय त्या दोघांच्याही प्रक्रियांमध्ये रूपकांच्या वापराची क्रिया मूलभूत उपयोगाची आहे. या दोन्ही शास्त्रांचा विभागणारी सीमारेषा अतिशय अस्पष्ट असल्याने त्यात अर्थशास्त्राचा भाग कुठे संपतो आणि शैलीशास्त्राचा

भाग कुठे सुरू होतो हे ठरविणे अतिशय अवघड पण अत्यंत आवश्यक होते.

बऱ्याच वेळा असे दिसते की अनेक शब्दांचा नेमका मूळ अर्थ काय होतो आणि त्यापासून वक्रता कुठे निर्माण झाली हे त्या शब्दांच्या इतिहासात कधीच ठरविता येणार नाही. अर्थात त्यात आपला दोष नसतो. मुळात लिहिण्याची प्रथा/लिपीची उपलब्धी या अगदी अलीकडच्या काळातील घटना आहेत. त्यातही भूर्जपत्र/कागद यांचे आयुष्य सीमित असते. दुसरे म्हणजे एखादा लिखित कागद उपलब्ध होईपर्यंत इतर अनेकांचा कायमचाच नाश झालेला असतो.

दुसऱ्या दिशेने पाहता शब्दांचा इतिहासही फार भरवशाचा नसतो. शब्दांच्या वापरात किती काळपर्यंत तो शब्द लक्षणा या रूपात वावरत होता आणि अश्मीभवनामुळे तो केव्हा अभिधा या स्वरूपात आला हेही सांगणे अतिशय अवघड असते. त्याहीपेक्षा अवघड म्हणजे जेव्हा तो प्रथम वापरला गेला तेव्हातरी तो लक्षणा याच रूपात होता की अभिधा या स्वरूपात होता हे सांगणे आहे.

भाषाव्यवहारातसुद्धा एखादा शब्द सुरुवातीला वापरलेला होता तेव्हासुद्धा तो एखाद्या मूळ रूपकाचे अश्मिभूत रूप नव्हता हे ठरवायला नेमके असे निकष उपलब्ध नाहीत.

काही काळी वेळा तर एखादा शब्द प्रथम मूळ रूपक नंतर अभिधा नंतर पुन्हा कधी रूपक अशा उलट सुलट दिशांनी प्रवास करताना दिसतो. उदा० हस्त या शब्दावरून मराठीतील हात हा शब्द तयार झालेला आहे. तेव्हा सध्याच्या संस्कृतमध्ये किंवा सध्याच्या मराठीत हस्त किंवा हात ही रूपके नसून ती वाच्यार्थाने वापरलेली नामे आहेत हे निर्विवाद आहे. पण तरीही ती नेहमीच तशी वापरलेली असतात असे मात्र नाही. उदा० चांदण्याचे हात या रूपकातील हात हा शब्द रूपक म्हणूनच वापरल्याचे दिसते. त्यामध्ये त्याचा प्रवास रूपक ♑ वाच्यार्थ : : वाच्यार्थ ♑ रूपक असा झाल्याचे दिसते. मूळ 'हात' हे रूपक असावे, नंतर ते वाच्यार्थाने वापरात आले असले पाहिजे. पण वरील उदाहरणात ते पुन्हा रूपक या रूपात वापरलेले आहे. अशा परिस्थितीत त्याचा प्रवास रूपक ते वाच्यार्थ आणि पुन्हा रूपक अशा दिशेने झालेला आहे. या कारणामुळे रूपक किंवा इतर अलंकार वापरताना कवी त्या शब्दाच्या मूळ अर्थापासून वेगळा अर्थ वापरतो असे म्हणणे अशक्य होऊन बसते. कारण वक्रता हे अलंकाराचे चिन्ह मानायचे झाले तर ही वक्रता त्या शब्दाच्या आयुष्यातील कोणत्या टप्प्यावर, कोणत्या काळी, कुठे निर्माण होते हे सांगता येत नाही. म्हणून ॲरिस्टॉटलने शब्दाच्या 'प्रचलित' अर्थापासून केलेली वक्रता (deviation from the current meaning of the word) हे रूपकाचे गमक मानलेले आहे. परंतु त्यातही सर्वच शब्दांना रूपकाचे कार्य करता येत नाही. किंबहुना

वाक्यातील सर्वच शब्द आलंकारिक म्हणून वापरलेले असले तर ते वाक्य भाषाव्यवहारात वापरताच येणार नाही. आधी नमूद केल्याप्रमाणे या घटनेमागील तत्त्व असे आहे की वाक्यातील इतर शब्दांचा अर्थ वाच्यार्थाने घेतला तरच त्यात रूपक या रूपाने वापरलेल्या शब्दाला आलंकारिकता प्राप्त होते.

या संदर्भात आय.ए. रिचर्डस्‌ने असे दाखवून दिलेले आहे की प्रत्यक्षामध्ये वाक्यातील शब्दांचे अर्थ आपल्याला वाटतात त्याप्रमाणे स्थिर नसतात. त्यात वापरलेला एकच शब्द रूपक असतो; उरलेल्या सर्वच शब्दांचा जो वाच्यार्थ आहे तोच प्रमुख अर्थ असतो. उदा० आईने त्यांच्यावर मायेचे छत्र धरले. या वाक्यातील आई आणि त्यांच्यावर हे शब्द वाच्यार्थाने वापरलेले असतील तरच मायेचे छत्र धरले हे रूपक अलंकार म्हणून वापरता येते.

पण वाक्यातील नेमका कोणता शब्द या स्वरूपातील आहे आणि कोणता अभिधा या स्वरूपातील आहे हे त्या वाक्याच्या नुसत्या रचनेवरून सांगता येणार नाही. उदा० 'या प्रश्नाचे उत्तर देताना प्रधानमंत्र्यांनी टोपी फिरवली/कोलांटी उडी मारली' असे वाक्य असेल तर त्यातील एकच शब्द रूपक या अर्थाने घेतलेला असतो. उदा० एकतर टोपी फिरवली हा वाक्प्रयोग आलंकारिक मानता येईल किंवा प्रधानमंत्री हा शब्द रूपक मानावा लागेल. त्यातील दोन्हीही एकाच वेळी रूपक असू शकत नाहीत. उलट दुसऱ्या मूलभूत नियमाप्रमाणे त्यातील एक तरी शब्द रूपक असलाच पाहिजे, नाहीतर हे वाक्य आलंकारिक होत नाही.

या तत्त्वाची दुसरी बाजू ही की वाक्यातील उरलेले सर्व शब्द त्यांच्या वाच्यार्थानेच घ्यायचे असतात हे खरे आहे. पण प्रत्यक्षात रूपक म्हणून वापरलेला शब्द 'प्रधानमंत्री' हा आहे की 'टोपी फिरवणे' हा आहे. हे नुसते वाक्याच्या रचनेवरून ठरविता येणार नाही; त्यासाठी त्याच्या सामाजिक संदर्भाबरोबर व्याकरण, ध्वनिशास्त्र, तर्कशास्त्र समाजविज्ञान, अर्थशास्त्र, शैलीशास्त्र इ. अनेक शास्त्रांतील प्रक्रियांचे धागेदोरे तपासावे लागतात. या सर्व कारणांमुळे वाक्यातील कोणता शब्द अभिधेने वापरलेला आहे आणि कोणता शब्द लक्षणेने वापरलेला आहे हे ठरविण्यासाठी त्यात त्या शब्दाचा प्रत्यक्ष सामाजिक वापर कसा झालेला आहे हे लक्षात घ्यावे लागते.

या प्रकारातही काही अशा गोष्टी दिसून येतात की त्यांचा मानवी भाषेच्या अभिव्यक्तीसामर्थ्याशी साक्षात संबंध दिसतो. अशा वेळी एकच शब्द किंवा त्यामागची संकल्पना अभिधा म्हणून वाच्यार्थ, लक्षणा म्हणून रूपक आणि प्रतीक या तीन वेगवेगळ्या पातळ्यांवर कार्य करतात. किंबहुना याच प्रक्रियांमुळे भाषा अभिव्यक्तीसामर्थ्यसंपन्न होते. कारण या प्रक्रियेत शब्दाचे रूपांतर नुसते चिन्ह (साइन)

या अवस्थेतून रूपक आणि नंतर प्रतीक या अवस्थेत होते.

या प्रक्रियेत शब्दाच्या शब्दस्वरूपापेक्षा त्यांच्या अर्थघटकांना महत्त्व असते : त्यामुळे त्यांचे ध्वनिस्वरूप बदलले तरी हरकत नसते. उदा० संस्कृतमध्येच गाय किंवा बैल यांचा निर्देश करण्यासाठी गो/गौ हा शब्द वापरतात. लक्षणेने बैल हा शब्द निर्बुद्ध माणसांच्यासाठी वापरता येतो. म्हणून द्यूतप्रसंगाच्या वेळी मूर्खासारखे वागणाऱ्या पांडवांना गो असे म्हणून दुःशासनाने त्यांचा अपमान केला. या उलट बैल हे सामर्थ्याचेसुद्धा प्रतीक आहेच. पण मग वर म्हटल्याप्रमाणे त्याची मूळ संकल्पना कायम ठेवून त्याचे ध्वनिरूप बदलणे आवश्यक होते. ते संस्कृत, मराठी यांनी वृषभ हा शब्द वापरून केलेले आहे. बैल हे सामर्थ्याचे प्रतीक असल्याने शूर, सामर्थ्यवान अर्जुनाचा उल्लेख श्रीकृष्णाने वृषभ/भरतवर्ष असा करून त्याचा सन्मान केलेला आहे. कालिदासाने दिलीपाचे वर्णन वृषस्कंध, महाबाहू असे केलेले आहे, त्यालाही वृषभ या शब्दाचा हाच प्रतीकात्मक अर्थ अभिप्रेत आहे.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| गो | → | अभिधा | → | निर्देश |
| गो | → | लक्षणा | → | रूपक |
| गो / वृषभ | → | लक्षणा | → | प्रतीक |

हा त्यांचा भाषाव्यवहारातील प्रत्यक्ष उपयोग आहे.

सामान्य भाषाव्यवहारात इतरही अनेक प्रकारची रूपके वापरली जात असतात. त्यामुळे प्रत्यक्षात कोणता शब्द अभिधाशक्तीने तर कोणता शब्द लक्षणेने/प्रतीकरूपाने वापरला जातो हे ठरविणे अवघड असते.

व्यंजना या शक्तीने त्याच शब्दाचा वेगळा अर्थ प्रतीत होतो. व्यंग्यार्थाने काही म्हणणे यामध्ये प्रॅग्मॅटिक्स, स्टाईल ऑफ स्पीच, कॉन्व्हर्सेशन ॲनॅलिसिस, डिस्कोर्स ॲनॅलिसिस इत्यादी अनेक प्रक्रियांचा अंतर्भाव केला जातो. या सर्वांचाच भाषा व्यवहारामध्ये वापर होतो. सर्वसाधारणपणे संस्कृत अर्थशास्त्रज्ञांच्या विवेचनांमध्ये व्यंग्य अर्थ म्हणजे सूचित अर्थ किंवा ध्वनित अर्थ असे म्हटलेले आहे. सामाजिक संदर्भानुसार एका व्यक्तीसाठी एक आणि दुसऱ्या व्यक्तीसाठी अन्य काही असा अर्थ व्यक्त केलेला असताना त्याला सूचित अर्थ म्हणतात. उदा० एखाद्या कुलटा स्त्रीला तिचा पती घरी आलेला आहे हे सूचित करण्यासाठी तिची मैत्रीण सांकेतिक असे बोलते ते प्रत्यक्षात तिच्यासाठी एक सूचना पण तिच्या पतीसाठी सर्वसामान्य, साधा अर्थ असे दोन स्तरांवरील अर्थ व्यक्त केलेले असतात. या विवेचनावरून असे वाटण्याची शक्यता आहे की वाच्यार्थ किंवा लक्षणा हे फक्त भाषाव्यवहारापुरते मर्यादित असून व्यंग्य अर्थ वाक्याच्या सामाजिक संदर्भावर अवलंबून असतो. प्रत्यक्षात भाषा ही सर्वतः

सामाजिकच असल्यामुळे कोणत्याही शब्दाचा अर्थ सामाजिकतेच्या संदर्भातच व्यक्त होत असतो. त्यामुळे व्यंजना हा वेगळा प्रसंगपर अर्थ आहे असे मानण्याचे कारण नाही. प्रसंगपर अर्थाची चर्चा मी यथावकाश करीन. माझ्या मते व्यंग्य अर्थ हाही शब्दानुसार अर्थ आहे.

**वाक्यगत अर्थ :** व्याकरणपर अर्थ किंवा वाक्यगत अर्थ हा वाक्यातील शब्दांच्या एकमेकांशी असणाऱ्या संबंधावर अवलंबून असणारा अर्थ आहे. या विषयावर अनेक उत्तमोत्तम पुस्तके उपलब्ध आहेत. त्यामुळे त्याचा इथे विशेष विचार करण्याचे कारण नाही.

**परंपरापर अर्थ :** हा अर्थाचा एक विशेष प्रकार असून प्रत्यक्ष भाषा व्यवहारात तो नेहमीच आपण वापरत असतो तरी त्याचे विवेचन कुठेही आढळत नाही. वर म्हटल्याप्रमाणे प्रत्येक शब्द किंवा वाक्प्रचार हे ती भाषा वापरणाऱ्या समाजाच्या भाषा-व्यतिरिक्त परंपरांच्या चौकटीत वापरले जातात. त्या परंपरांचा आधार घेऊनच त्यांचा अर्थ लावणे आवश्यक असते. तसे केले नाही तर अर्थाचा अनर्थ होण्याची शक्यता असते. उदा० छांदोग्य उपनिषदात 'यदग्ने रोहितं रूपं' अशी सुरूवात करून 'यत्कृष्णं तदन्नस्य' म्हणजे अग्नीचे जे काळे स्वरूप आहे ते अन्नाचे आहे असे म्हटलेले आहे. या विधानात अन्न या शब्दाचा अर्थ पृथ्वी असा करावा लागतो; कारण छंदोगांच्या परंपरेनुसार अग्नी आणि आप या महाभूतांच्या उल्लेखानंतर पृथ्वी या महाभूताचा उल्लेख करताना अन्न हा शब्द वापरता येतो. या जागी अन्न या शब्दाचा नेहमीचा अर्थ वापरता येत नाही.

भगवद्‌गीतेमध्ये भक्ताला ईश्वराचे स्वरूप का कळत नाही याचे कारण सांगताना श्रीकृष्णांनी 'मायेने आच्छादिले असल्यामुळे' असे दिलेले आहे. याचा अर्थ सांगताना गीतारहस्यामध्ये टिळकांनी असे म्हटले आहे की ईश्वर मायेने आच्छादिला असल्यामुळे सामान्य मनुष्याला त्याचे स्वरूप कळू शकत नाही. प्रत्यक्षात ईश्वर अनादि आणि अनंत असल्यामुळे त्याला दुसरे काही- माया किंवा अन्य काही- आच्छादन करू शकत नाही असे भारतीय पंरपरेमध्ये मानलेले आहे. आच्छादित होतो तो सामान्य मनुष्य ईश्वर नव्हे. त्या आच्छादनामुळे मानवाला ईश्वराचे स्वरूप कळत नाही असा श्रीकृष्णांच्या विधानाचा परंपरापर अर्थ आहे. एक आश्चर्य म्हणजे ज्ञानेश्वरीची प्रत संपादन करताना वस्तुतः प्रा. शं.वा. दांडेकर हे ज्ञानेश्वरांनी गीतेचा जो अर्थ लावलेला आहे तोच सांगत आहेत; पण त्यांनीही या ठिकाणी टिळकांचाच अर्थ दिला आहे, पण स्वत: ज्ञानेश्वर मात्र भारतीय परंपरेनुसार सिद्ध होणारा अर्थ सांगतात. ईश्वर, माया, आच्छादन या शब्दांचे परंपरागत अर्थ न लावल्यामुळे टिळक आणि दांडेकर मूळ अर्थाच्या एकदम विरुद्ध, श्रीकृष्णांना मान्य नसणारा - मान्य होऊ न शकणारा - अर्थ सांगतात.

**प्रसंगपर अर्थ :** हा अर्थ आणि व्यंग्य/सूचित अर्थ या दोन्ही गोष्टी एकच आहे असे आपल्याला सर्वसामान्यपणे वाटत असते. मात्र व्यंग्य अर्थ ही श्रोत्यांच्यासाठी दोन वेगवेगळे अर्थ व्यक्त करतो. तेव्हा खरे म्हणजे ते एकाच वेळी घडणारे दोन वेगवेगळे प्रसंग आहेत असे मानणे अधिक सयुक्तिक आहे. प्रसंगपर अर्थ करताना हा अर्थ सर्वच श्रोत्यांसाठी सर्वकाळ व्यक्त होत असतो. काही काही वेळा एखाद्या विशिष्ट प्रसंगामध्ये एखादा शब्द पारिभाषिक संज्ञेप्रमाणे वापरलेला असतो तेव्हा तिथे त्याची - थोड्याफार फरकाने - काही व्याख्याच केलेली असते. अशा परिस्थितीत त्याचा व्याख्याभूत अर्थ वापरणे आवश्यक असते. या अर्थाला कोणताही अपवाद नसतो. शास्त्रातील पारिभाषिक संज्ञांची व्याख्या करावी लागते यात फार काही नवीन नाही. पण उत्कृष्ट कलाकृतींमध्येही अनेक शब्दांच्या व्याख्या केलेल्या असतात. साधारण भाषेच्याही वापरात थोड्याफार फरकाने असेच करावे लागते. शास्त्र किंवा कलांइतक्या अपवादरहित व्याख्या वापरण्याचे प्रसंग भाषेमध्ये क्वचितच निर्माण होतात असे वाटण्याची शक्यता आहे. तसे ते खरेही आहे. तसे असले तरी भाषेतील बहुतेक सर्वच शब्द थोड्याफार फरकाने पारिभाषिक संज्ञा असल्यासारखे दिसतात. त्या दृष्टीने सर्वच शब्द त्यांच्या त्यांच्या प्रसंगपर अर्थानेच वापरले जातात. किंबहुना पारंपरिक अपेक्षांप्रमाणे प्रसंगपर व्याख्यांची अपेक्षा करणे हाही भाषा-व्यवहाराचा एक महत्त्वाचा भाग आहे.

प्रसंगपर व्याख्येचे/अर्थाचे एक उत्कृष्ट उदाहरण छांदोग्य उपनिषदाच्या पहिल्या अध्यायात सापडते. उषस्ति चाक्रायण हा ऋषी एका यज्ञात भाग घेण्यासाठी जातो. त्या यज्ञातील प्रस्तोता ज्या देवतेची स्तुती करत असतो ती देवता कोण आहे हे त्याला माहित नसते. त्या देवतेचे नाव प्राण आहे असे उषस्ति त्याला सांगतो. (छां. 1.11.5) या वेळी प्राण या शब्दाचा अर्थ कसा करायचा असा प्रश्न निर्माण होतो तेव्हा त्याचा अर्थ ब्रह्म असा करावा असा निर्णय सूत्रकार व्यास देतात. ब्रह्मामध्ये सृष्टीची उत्पत्ती, स्थिती आणि लय या तिन्ही क्रिया होतात - किंबहुना तीच ब्रह्म या शब्दाची व्याख्या आहे. ब्रह्माची ही लक्षणे प्राण या देवतेची जी लक्षणे उषस्तिने सांगितलेली आहेत त्यातही दिसून येतात. त्यामुळे या संदर्भात प्राण या शब्दाचा अर्थ ब्रह्म असा करावा लागतो.

**कथात्मक अर्थ :** एका दृष्टीने पाहिले तर कथात्मक अर्थ हा प्रसंगपर अर्थच असतो. परंतु कोणतीही कथा ही अनेक प्रसंगांना सुसूत्रतेने बांधून तयार होते. एखाद्या प्रसंगात एखाद्या शब्दाची काही ठरावीक व्याख्या केलेली असेल तर तोच अर्थ इतरही प्रसंगांमध्ये वेगवेगळ्या स्वरूपात मांडला तर हा कथात्मक अर्थ व्यक्त केलेला आहे

असे म्हणता येते. या सर्वच प्रसंगांमध्ये व्याख्येची प्रधान कल्पना अनुस्यूत राहाते. एखाद्या पदार्थाची व्याख्या करताना त्या पदार्थाच्या सर्व आवश्यक त्या गुणधर्मांचा निर्देश करणे आवश्यक असते. त्या दृष्टीने पाहता असे म्हणता येईल की कथेतील वेगवेगळ्या प्रसंगांमध्ये एखाद्या शब्दाच्या अर्थाचे हे विविध पैलू व्यक्त करायचे आहेत त्यांचा निर्देश करून संपूर्ण कथानकामध्ये त्या शब्दाचा किंवा गोष्टीचा जो अर्थ लेखकाला किंवा बोलणाऱ्याला अभिप्रेत असतो तो अर्थ तो कवी कथात्मक अर्थ म्हणून व्यक्त करतो.

याचे एक उत्कृष्ट उदाहरण दुष्यंत आणि शकुंतला यांच्या कथेमध्ये मिळते. देशाचा आदर्श नेता, आदर्श पत्नी, आदर्श विचार यांचा कालिदासाला काही एक विशिष्ट अर्थ अभिप्रेत आहे तो व्यक्त करण्यासाठी त्याने अभिज्ञानशाकुंतलम् लिहिले हे शाकुंतलात आढळणाऱ्या कथेची महाभारतातील दुष्यंत-शकुंतलेच्या मूळ कथेशी तुलना करताना लगेच लक्षात येते. व्यासांनी वर्णन केलेली शकुंतला ही एक उच्छृंखल, कामिनी तरुणी आहे. तिला फारसे विधिनिषेध नाहीत. ग्राम्य भाषेत तिचे वर्णन कदाचित 'उठवळ बाई' असे करता येईल. पित्याच्या अनुज्ञेची वाट न पाहताच, ती पाहिल्याच भेटीत दुष्यंताबरोबर समागम करते. तिने मेनका आणि विश्वामित्र यांच्या समागमाचे वर्णन केले आहे ते तर कित्येक वाचकांना कदाचित अश्लील वाटू शकेल. महाभारतातील दुष्यंतही एक सामान्य मनुष्य आहे. गरोदर अवस्थेत त्याच्याकडे आलेल्या शकुंतलेला तो ओळखतो पण ओळख दाखवत नाही; कारण त्याला (कदाचित आपल्या कुळाबद्दल) लोक काय म्हणतील, याची भीती वाटते. त्या वेळी आकाशवाणी होऊन शकुंतला ही त्याचीच पत्नी आहे आणि तिच्या गर्भात त्याचाच वंश वाढत आहे असे लोकांना कळते. त्या दृष्टीने/पर्यायाने दोघेही निष्कलंक आहेत अशी धर्माची/रूढीची त्यांना मान्यता मिळते तेव्हाच तो तिचा स्वीकार करतो.

या मूळ कथेचे कालिदासाने केलेले रूपांतर म्हणजे त्यातील प्रत्येक गोष्टीत केलेला आमूलाग्र बदल आहे. शाकुंतलातील शकुंतला ही एक आदर्श कन्या, आदर्श स्त्री आणि आदर्श पत्नी आहे. तिच्यामध्ये आदर्श माता आणि आदर्श राणी यांचेही गुण आहेत. या कथेतील दुष्यंतही आदर्श पुरुष आहे. त्याच्यावर झालेल्या सुसंस्कारांची ओळख त्याच्या शब्दाशब्दातून/त्याच्या बोलण्याचालण्यातून पटते. या कथेत केवळ दुर्वासांच्या शापामुळे तो शकुंतलेला ओळखत नाही, अन्यथा त्याने तिच्याशी प्रतारणा केली नसती. एका कोळ्याला मिळालेली तिची अंगठी पाहिल्यावर त्याच्या सुसंस्कृत मनाला झालेले दुःखही कालिदासाने अतिशय हृद्यपणे दाखविलेले आहे. पण एवढ्यावरही कालिदासाचे समाधान होत नाही. तो त्यांचा वियोग घडवून आणून त्यांना

एक प्रकारे तपश्चर्या करायला भाग पाडतो. अशा आदर्श मातापित्यांच्या पोटी जन्माला आलेला मुलगा भारताचा सर्वश्रेष्ठ सम्राट व्हावा हे योग्यच आहे. (नाही तरी शकुंतलेला 'सुतं त्वमपि सम्राजं सेव पूरुमवाप्नुहि' असा आशीर्वाद गौतमीने दिलेलाच होता.) त्या महान भरताच्या नावावरून या देशाचे नाव भारत असे पडावे हेही योग्यच आहे. या महामिथक कथेच्या आधाराने कालिदासाने राजा, राणी, कन्या, माता, पिता, अशा सर्वच शब्दांना एक वेगळाच आयाम दिलेला आहे.

हॅम्लेटची कथा सांगताना शेक्स्पियरनेही ज्याचा दुःखद अंत झाल्यास त्याला शोकांतिका म्हणता येईल अशा थोर, आदर्श पुरुषांपैकी एकाचे व्यक्तिचित्रण केले आहे. 'Oh that this too, too sullied flesh would thaw, melt and resolve into dew' असे म्हणणारा हॅम्लेट किती संवेदनक्षम आहे हे त्याच्या पहिल्याच भेटीत स्पष्ट होते. तो प्रगाढ विद्वान आहे हे त्याच्या 'There are more things in heaven and earth than are dreamed of in your philosophy, Rosencrantz' या वाक्यावरून वाचकांना कळू शकते. ऑफेलियाच्या चाळीस हजार भावांनाही तिच्यावर हॅम्लेटइतके प्रेम करता आले नसते या वस्तुस्थितीवरून त्याच्या भावना किती सखोल आहे हे लक्षात येते. 'I knew Yorrick, Horatio... a man of infinite jest, of most excellent fancy' असे तो जेव्हा म्हणतो तेव्हा शेक्स्पियर त्याच्या विनोदबुद्धीची आणि कल्पनाशक्तीची प्रचिती आणून देतो. तो एक कविप्रकृतीचा कलावंत आहे हे त्याच्या 'Oh what a piece of work is man...' या भाषणावरून दिसून येते. याप्रमाणे प्रत्येक प्रसंग किंवा प्रत्येक मोक्याच्या वेळी शेक्स्पियर एका उमद्या - बहुधा सर्वगुणसंपन्न - अशा व्यक्तिमत्त्वाचे वर्णन करत असतो. शेक्स्पियर कधीही शब्दामध्ये हॅम्लेटचे गुण सांगत नाही तर एकावर एक वीट रचत इमारत उभी करावी त्याप्रमाणे अनेकविध प्रसंगांची सुसूत्र मालिका रचत त्या व्यक्तिमत्त्वातील विविध पैलूंचा निर्देश करतो. अशा अत्यंत गुणी असलेल्या हॅम्लेटचा दुःखद अंत व्हावा हा शोकांतिका या शब्दाचा खरा अर्थ आहे. हा आणि असे अनेक अर्थ शेक्स्पियर शब्दात व्यक्त करत नसतो. तो त्याच्या काव्यात्म आणि नाट्यात्म कल्पनाशक्तीचा विलास आहे, तो त्याच्या कलेचा परमोच्च बिंदू आहे.

अशा कथापर अर्थांनी सिद्ध होणारे अनेक शब्द आपण सर्वसाधारण भाषाव्यवहारात कायम वापरत असतो. एखाद्या व्यक्तीचे संपूर्ण आयुष्य हे समाजाला उद्‌बोधन करणारी कथा असते या तत्त्वाचा वापर केला तर राम, जनक इत्यादि अनेक शब्दांचे व्यक्तिवाचक अर्थ मागे पडून ते प्रतीकासारखे एकच शब्द/समानार्थी

शब्द म्हणून वापरता येतात. त्यामुळे सध्या आदर्श राजा या कल्पनेसाठी राम हा शब्द किंवा न्यायनिष्ठुरतेसाठी डॅनियल, अतिमानवी शक्तीसाठी हर्क्युलिस , नीचपणासाठी नीरो, ज्ञान आणि शहाणपणा यांच्यासाठी सॉलोमन, थोर राजांसाठी जनक ही नावे समानार्थी शब्द म्हणून वापरण्याची पद्धत आहे. याचे कारण त्या त्या व्यक्तींच्या आयुष्यात घडलेल्या घटनांमधे ते अर्थ दृढ झालेले आहेत हे आहे. या प्रमाणे इतरही अनेक शब्दांचा अर्थ हा कथापर अर्थ असतो असे म्हणता येईल.

## संदर्भ सूची


आल्स्टन, डब्ल्यू. पी. (1964) फिलॉसॉफी ऑफ लँग्विज. (एंगलवूड क्लिप्स, प्रेंटिस हॉल, न्यू जर्सी)

धोंगडे, र. वा. (1982) अर्थविन्यास, समाविष्ट (सं) कल्याण काळे आणि अंजली सोमण, वर्णनात्मक भाषाविज्ञान, स्वरूप आणि पद्धती. पृ.128-140 (नाशिक, गोखले एज्युकेशन सोसायटी)

ग्राईप, पी. (1968) अटरर्ज मीनिंग, सेन्टेन्स मीनिंग अॅंड वर्ड मीनिंग. फाऊंडेशन्स ऑफ लॅंग्विज. खंड 4, पृ. 225-242

कॅट्झ, जे. जे. (1972) सेमँटिक थियरी न्यू यॉर्क, हार्पर अँड रो.

कुंजुन्नी राजा (1963) इंडियन थियरीज ऑफ मीनिंग. अड्यार, अड्यार लायब्ररी रिसर्च सेंटर.

झुईयां, ए. (1954) रिव्ह्यू ऑफ शार्ल ब्रूनोज 'इस्त्वार द ला लांगाज फ्रांस्येज'. लँग्विज खं. 13 पृ. 313-38

पुंडलीक , शै. स. (1989) द रीति स्कूल ऑफ पोएटिक्स अँड इट्स रिलेव्हन्स टु मॉडर्न अप्रोचेस टु स्टाईल, (अप्रकाशित पीएच्.डी.प्रबंध) पुणे विद्यापीठ, पुणे

पुंडलीक, शै. स. (1995) अर्थनिर्धारणाची प्रक्रिया आणि भाषाविज्ञान, भाषा आणि जीवन, वर्ष 13 : अंक 2, पृ. 23-30

पुंडलीक, शै. स. (1995) ज्ञाननिष्पत्ती, अर्थनिर्धारण आणि भाषाविज्ञान, भाषा आणि जीवन, वर्ष 13: अंक 3, पृ.18-26

पुंडलीक, शै. स. (1996) ज्ञानप्रक्रिया आणि भाषाव्यवहार, भाषा आगि जीवन, वर्ष 14 : अंक 1, पृ.17-24.

पुंडलीक, शै. स. (1999) अर्थविचार, समाविष्ट (संपादक) कल्याण काळे आणि अंजली सोमण, आधुनिक भाषाविज्ञान, पृ. 147-176 (प्रतिमा प्रकाशन, पुणे)

पुंडलीक, शै. स. (2003) इंग्रजीतील ‘kn’ ने सुरू होणाऱ्या शब्दांविषयी, भाषा आणि जीवन, वर्ष 21 : अंक 3, पृ.16-25

पॉस्नेर, रोलंड (1982) रॅशनल डिस्कोर्स अँड पोएटिक कम्युनिकेशन. न्यू यॉर्क, मुतॉ पब्लिशर्स.

ब्लॅक, मॅक्स (1962) मॉडेल्ज् अँड मेटॅफर्ज, इथाका, कॉर्नेल युनिव्हर्सिटी प्रेस, पृ. 25-47.

याकोब्सन, रोमँ (1960)‘क्लोजिंग स्टेटमेंट : लिंग्विस्टिक्स अँड पोएटिक्स’ समाविष्ट, सिबिऑक : स्टाइल इन लँग्विज्, पृ. 350-377.

रिफातेर, एम (1959) क्रायटिरिया फॉर स्टायलिस्टिक ॲनिलिसिस, वर्ड, 15 पृ : 157-74.

रिफातेर, एम. (1960) स्टायलिस्टिक काँटेक्स्ट, वर्ड, 16 पृ.207-18

स्पिट्झर, लिओ (1948) लिंग्विस्टिक्स अँड लिटररी हिस्टरी, प्रिन्स्टन, प्रिन्स्टन युनिव्हर्सिटी प्रेस

■

**उपयोजित भाषाविज्ञान आणि भाषाशिक्षण विभाग**
**श्री. ना.दा. ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई ४०० ०२०.**

## ‘भाषा आणि जीवन’कडे परीक्षणासाठी आलेली पुस्तके

१. ‘मुलांची भाषा आणि शिक्षक’, - कृष्णकुमार (मराठी रूपांतर - वर्षा सहस्रबुद्धे) मूलगामी प्रकाशन, पुणे ४११००२. पृष्ठे ८४, किंमत रु. ८०/-
२. ‘अनाहूत आणि इतर सिंधी कथा’, - लेखक आणि प्रकाशक प्रा.लछमन हर्दवाणी ‘कविता’, प्रोफेसर कॉलनी, सावेडी, अहमदनगर ४१४००३.
३. ‘मानवी भाषाविज्ञान : उच्चारसातत्य’, पृष्ठे १९१, किंमत रु. ४००/-
४. ‘पर्सेप्शन, साऊंड, प्रोज अँड पोएट्री’, पृष्ठे १६९, किंमत रु. ४००/-
५. ‘मराठी पद्यातील लगुत्व ओळखण्यासाठी नियम’, पृष्ठे ३४, किंमत रु. ८०/-
(क्र. ३, ४ व ५ या पुस्तकांचे लेखक - शुभानन गांगल)
प्रकाशक - गांगल्ज्, १९/२०, आयडियल अपार्टमेंट्स, गुलमोहर रोड, जुहू, मुंबई ४०००४९.
६. ‘ब्रेनटॉनिक’ (मराठी-इंग्रजी ज्ञानवर्धक मासिक), वर्ष १, अंक १, डिसेंबर २००५ २४, चेरी हिल, पाइपलाइन रोड, आनंदवल्ली, नाशिक ४२२०१३.
७. ‘संस्कृत साहित्य परिचय’ - वसंत भ.उत्पात, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे ४११०३०.

# संगणकातून पद्याचा आस्वाद

**शुभानन गांगल**

गद्यातील ध्वनी, उच्चारातील अर्थाशी संबंध ठेवतो. मानवाने शब्दाला दिलेल्या अर्थापलीकडील, ध्वनीतल्या स्वाभाविकतेतील नैसर्गिक अर्थ, संगीताला आपलासा करायचा असतो. तर पद्य नियमित पडणाऱ्या चरणाच्या तुकड्यातील कालापन सांभाळत, मानवाने शब्दाला दिलेले अर्थ आणि ध्वनीतील स्वाभाविक नैसर्गिक अर्थ, यांचा सुंदर संगम करते.




**'ध्वनीतील स्वाभाविक नैसर्गिक अर्थ'** : ध्वनीतून कळणारे हे अर्थ मानवाने निर्माण केलेले नसतात. सर्व प्राणिमात्रांना ते त्याच स्वरूपात समजतात. उदाहरणार्थ, एखाद्या कुत्र्याचा पाय गाडीखाली आल्याने तो किंचाळला तर त्या ध्वनीतून वेदनेतील दु:ख आपल्याला सामोरे येते. म्हणजे यातून आपल्याला वेदना होते असे नव्हे. सैनिकाला गोळी लागल्याने तो किंचाळला तर मित्रपक्ष दु:खी होईल व शत्रुपक्षात आनंद साजरा होईल ! पण त्या किंचाळण्यातून सैनिकाला झालेल्या वेदनांचा अर्थ दोन्ही पक्षाला कळतो. याला 'ध्वनीतील स्वाभाविक नैसर्गिक अर्थ' म्हणता येते.



अनुक्रमणिका

**'मानवाने शब्दाला दिलेले अर्थ' :** अक्षरातून शब्द बनतात. शब्दांना अर्थ असतो. हा अर्थ त्या भाषेने त्या शब्दाला दिलेला असतो. शब्दातील अर्थ मानव निर्माण करतो. समजा एखाद्या कुत्र्याला दररोज 'गाढव, गाढव...' असे म्हणत खायला दिले गेले, तर काही दिवसांनी त्या कुत्र्याला 'गाढव' याचा अर्थ 'खायला ये' असे वाटू लागेल ! शब्दांना दिलेले अर्थ हे मानवनिर्मित असतात. प्रस्थापित शब्दांचे अर्थ बदलणे हेही मानवाला शक्य असते. भाषा प्रवाही राहण्याचे हे एक कारण ठरते.

पद्य हे संगीत आणि गद्य या दोघांमधील सेतू आहे. कोणते पद्य गद्याशी अधिक जवळचे व कोणते पद्य संगीताच्या अधिक जवळचे यातून पद्याची व्याख्या ठरत नाही. एखाद्या पद्याचे आपल्या दृष्टिकोणातून या सेतूवरील स्थान कुठे आहे, हे प्रत्येकाने आपापल्या मनात ठरवायचे असते. आपल्याला भावणाऱ्या पद्याचे स्थान या सेतूवर कुठेही असू शकते.

भावना आणि विचार या शब्दांतील भिन्न अर्थ आपण जाणतो. भावना विचारातून मांडता येते आणि विचारातही भावना असतात. पण तरीही भावना आणि विचार यांच्या अर्थातील फरक आपल्याला कळतो. भावना नैसर्गिक असतात. त्या जन्मसिद्ध असतात. त्या आनुवंशिकतेतून मिळतात. भाषेचा वापर न करताही उच्चारित ध्वनीतून जो अर्थ प्रदर्शित केला जातो त्यात नैसर्गिक स्वाभाविकता असते. संगीत हेही ध्वनीमधल्या स्वाभाविकतेतील नैसर्गिकपणाकडे अधिक कललेले असते.

विचार व्यक्त करण्याची किमया मानवनिर्मित आहे. निसर्गाने दिलेल्या मेंदू, बुद्धी व मन यांचा वापर करून मानव भाषा बनवतो. उच्चारित व लिखित ध्वनीतून आपण संवाद साधतो. भाषा शिकायला लागते. ती आनुवंशिकतेतून प्राप्त होत नाही. मानवाने शब्दाला दिलेले अर्थ भाषेत असतात. त्यांना स्वाभाविक अथवा नैसर्गिक म्हणता येत नाही. अनुभव, संस्कार आणि स्मृतीतून, भावना आणि विचारांची सांगड घातली जाते. त्यामुळे भावना व विचार आपल्या मनात विलीन झालेले असतात. ते एकमेकांत इतके मिसळलेले असतात की त्यांना वेचून विभक्त करणे शक्य नसते.

त्याचप्रमाणे अनुभव, संस्कार आणि स्मृतींमुळे आपण गद्य आणि पद्य या दोन्ही ठिकाणी काव्याचा आस्वाद घेऊ शकतो. प्रत्येक पद्यात 'अर्थरूपी काव्य' असते. तसेच 'संगीतरूपी काव्य' असते. जेव्हा पद्यातील अर्थ आपल्याला भावतो तेव्हा त्यातील 'अर्थरूपी काव्य' आपल्या सामोरे येते. जेव्हा आपल्याला पद्यातील संगीत भावते तेव्हा त्यातील 'संगीतरूपी काव्य' आपल्या सामोरे येते. पद्यातील 'संगीतरूपी काव्य' निश्चित अर्थ-तपशिलाचे नसते तेव्हा ते अमूर्त, गूढ भासते. भाषेतल्या शब्दाची





अनुक्रमणिका

आपल्याला अर्थ या दृष्टिकोणातून अधिक ओळख असते. त्यामुळे 'संगीतरूपी काव्यात' प्रत्येक जण आपापला अर्थ शोधतो.

'अर्थरूपी काव्य' आणि 'संगीतरूपी काव्य' यांची जोडगोळी प्रत्येकाच्या मनात असते. शब्दाला भाषेने दिलेला अर्थ व आपल्या मनात त्याचा साकार झालेला अर्थ यात फरक असतो. तसेच ऐकायला येणारे संगीत व आपल्याला उमगलेले संगीत यात फरक असतो. याबाबतची आवडनिवड व्यक्तिविशिष्ट असते. त्यामुळेच कोणते पद्य कोणाला आवडेल हे सांगता येत नाही. पद्य हे मनाला भावणारे, हृदयाशी भिडणारे असावे असे प्रत्येकाला वाटते.

'अर्थरूपी काव्या'पासून ते 'संगीतरूपी काव्या'पर्यंतचा प्रवास म्हणजे गद्यापासून संगीतापर्यंतचा प्रवास होय. या प्रवासात ध्वनीचे कालमापन हा एक गुणधर्म अत्यावश्यक असतो. संगीतातील कालमापन व गद्यातील कालमापन आपल्याला भिन्न असल्याचे कळते.

पद्य हे, मानवाने निर्माण केलेल्या भाषेतील ध्वनी आणि निसर्गातील स्वाभाविक ध्वनी यांमधील सेतू असतो. भाषा व संगीत या दोन्ही ठिकाणी ध्वनी असतो. प्रत्येक भाषेतील लिखित अक्षरांना आणि बोलीतील उच्चारांना एक विशिष्ट गती असते. भाषेतील ध्वनीचे कालमापन करता आले तर त्याची सांगड संगीतातील ध्वनीला कशी लागू पडते हे ठरविता येते.

कालमापन कशाचे करत आहोत हे नक्की माहीत असल्याशिवाय ते करणे अशक्य असते. गती ही वस्तूला आलेली आपल्याला कळते. न दिसणाऱ्या ध्वनीतील कोणत्या गोष्टीला गती येते हे त्या त्या भाषेत ठरवावे लागते. हे ठरविण्याच्या दृष्टीने मराठी भाषा जगातील सर्वोत्तम भाषा आहे असे म्हणता येते.

ध्वनी नसतानाही बऱ्याच ठिकाणी आपल्या जाणिवांना ध्वनीचे कालमापन कळते. समजा, एखादी संगीताची मैफल सुरू आहे. गायक सुंदर तान घेऊन समेवर येतो. तबल्याचा व वाद्यांचा ठेकाही थांबतो. एक दिङ्मूढ आनंददायी शांतता जाणवते. ह्या शांततेतील विरामात 'संगीतरूपी काव्य' असते.

व्यंजनांच्या व स्वरांच्या मधील अत्यल्प अवधीत, अक्षरांच्यामधील विभक्तपणात, शब्दांमधील अंतरात, वाक्यामधील विरामात 'अर्थरूपी काव्य' असते.

'नियमित अंतरावर पडणाऱ्या पद्याच्या तुकड्यातील' विरामात 'अर्थरूपी काव्य' आणि 'संगीतरूपी काव्य' हे दोन्ही सामावलेले असते.

ध्वनीचे हे विरामातील,अवधीतील, विभक्तपणातील, अंतरातील आणि शांततेतील रूप आपल्याला भाषा, पद्य, संगीत यातील फरक अवगत करण्यास मदत करते.

संगणकातून गद्याचा वापर, वावर, उपयोग विविध भाषांतून होत आहे. पद्यातील ध्वनीचे विवक्षित गुणधर्म ध्यानात घेऊन पद्याचा वापर, वावर, उपयोग करून घेण्याची क्षमता कोणत्याही भाषेने संगणकातून अजमावून पाहिलेली नाही. जगात प्रथमत: हे घडवून आणण्याची किमया मराठीने साध्य केली आहे.

देवनागरी लिपीतून संगणकात काव्य-लेखन करताना अक्षरसंख्या, लघू अक्षरे, गुरू अक्षरे, लगुत्व, चरणातील कालमापन, विरामांच्या अस्तित्वासकट कालमापनाचा आलेख, पद्यातील पारंपरिक वृत्ते-जाती-छंदाचे बरेच प्रकार ओळखण्याची सोय, वृत्ते-जाती-छंद यांची माहिती, लगुत्वाची मांडणी, कोणत्याही दोन ओळींतील गुणधर्मांची तुलना, पद्याबद्दलच्या माहितीचे लेख, लगुत्व शोधण्यातील नियम, वगैरे बऱ्याच गोष्टी संगणकातून सहज कळतात. आम्ही (शुभानन गांगल व मंदार वालावलकर यांनी) हे साध्य करून दाखविलेले आहे.

देवनागरीचा वापर करणाऱ्या विद्यार्थ्यांना, शिक्षकांना, शाळांना, विद्यापीठांना आणि पद्याचा आस्वाद घेणाऱ्या सर्वांना हे कमी किमतीत उपलब्ध व्हावे अशी इच्छा आहे. त्यासाठी सरकारने, संस्थांनी, व्यक्तींनी हातभार लावावा अशी विनंती आहे. याबाबतच्या मदतीची अपेक्षा पुढीलप्रमाणे आहे :

(१) शाळांतून व विद्यापीठांतून याची मांडणी व सादरीकरण करणे.

(२) पद्याचा अभ्यास, प्रसार करणाऱ्या संस्थांमार्फत सादरीकरण करणे.

(३) पुढील टप्प्यातील संशोधनात व विकासात मदत करणे.

(४) कोणत्याही एका संस्थेने याचे यजमानपद स्वीकारणे.

(५) भारतीय भाषांतून संगणकात रचना निर्माण करणाऱ्या कंपन्यांनी त्यांच्या सॉफ्टवेअरमधे याचा समावेश करणे.

(६) इतर भारतीय तसेच परदेशी भाषांसाठी अशा पद्धतीची रचना निर्माण करण्यासाठी व संशोधनात भाग घेणे.

(७) विद्यापीठीय स्तरावरून ध्वनीबाबतच्या अभ्यासक्रमाची वेगळ्या दृष्टिकोणातील शक्यता अजमावून पाहणे.

■

१९/२०, आयडियल अपार्टमेंट्स, गुलमोहर मार्ग, सौराष्ट्र बस स्टॉप,
जुहू स्कीम, मुंबई ४०००४९.
दूरध्वनी क्रमांक : ३०९४७६७६, ३०९४७६७७, २६२०१४७३
ई-मेल : stgangal@yahoo.co.uk
Website : www.sgangal.com

# खानदेशी बोली आणि लोकतत्त्व : अभ्यासाच्या दिशा

डॉ. किसन पाटील

मराठीला एक भारतीय आर्य भाषा म्हणून ओळखले जाते. असे असले तरी मराठी बोलणारे सर्व लोक आर्यवंशाचे आहेत असे म्हणता येत नाही. कारण महाराष्ट्रात बरेच आर्येतर लोकही राहात होते. त्यांच्या भाषाही अतिशय वेगळ्या होत्या. आर्य-द्रविड भाषांच्या मिश्रणाच्या खुणा भाषा म्हणून मराठीत आणि इथल्या संस्कृतीत सरमिसळ झाल्याची अनेक चिन्हे उपलब्ध आहेत. वैदिक लोक आणि वेदेतर लोक अशी स्तरभेदाची मुळे इथे पूर्वापार रुजली. त्याचा प्रभाव भाषिक समाज गटांच्या जीवनावर पडला. मूळ वास्तव्य करून राहिलेल्या लोकांना 'खालचा थर' म्हणून संबोधण्याचे संकेत आर्य-आर्येतर संबंधातून रूढ झालेले आहेत. मूळ वास्तव्य करणाऱ्यांना स्वतःची मूळ भाषा टाकून, स्थित्यंतर स्वीकारून परकीयांची, परवंशाची भाषा व्यवहारभाषा म्हणून स्वीकारावी लागली. दोन भिन्न संस्कृतींच्या परस्पर-संबंधांतून, देवघेव प्रक्रियेतून भाषा-संकर होतो. त्याचा मूळ भाषेच्या शब्दसंग्रहावर ठसा उमटतो. त्या दृष्टीने संस्कृत-प्राकृत बोलींच्या प्रभावातून संक्रमित - अपभ्रंश भाषा रूढ होते. बोलींचे आणि प्रमाण-राजकीय भाषांचे संक्रमण ही दीर्घ प्रक्रिया असते. यातूनच मराठीचा उगम, विकास क्रमाक्रमाने झाला. म्हणूनच भाषा ही एका विशिष्ट प्रदेशातील (भूभाग) लोकसमूहाचे, तसेच अनेक लोकसमूहांचे संवाद-माध्यम म्हणून रूढ होते. म्हणून मराठीच्या म्हणजेच महाराष्ट्राच्या भौगोलिक परिवेशात अनेक बोलींचा आढळ होतो. दर बारा कोसावर बोली-भिन्नता आढळते. मराठीच्या वऱ्हाडी, कोकणी, दख्खनी मराठी, खानदेशी (अहिराणी) माणदेशी, झाडीपट्टी बोली, आदिवासींच्या विविध बोली, अशा कितीतरी बोलींचा ठळकपणे उल्लेख आढळतो.

जॉर्ज ग्रिअर्सन यांनी 'द लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया'मध्ये मराठीसंबंधी आणि तिच्या बोलींबाबत ठळक निष्कर्ष मांडले आहेत; परंतु ते सर्व खरेच आहेत असे नाही. ''मराठी प्रदेशाच्या वेगवेगळ्या भागांत कित्येक विस्कळीत बोली बोलल्या जातात. त्यांचा परामर्श भाषेच्या विविध रूपांच्या संबंधात घेतला जातो.'' मराठीच्या बोलींचा समूह समाज, संस्कृती, इतिहास, भूगोल आणि लोकपरंपरा या दृष्टीने त्यामुळेच भिन्नभिन्न ठरतो. यामुळेच भाषेची निर्मिती ही लोकसमूहाच्या लोकतत्त्वीय जडणघडणीतून होत असते, हे लोकभाषेचे सूत्र अभ्यासासाठी उपयुक्त ठरते.

इतिहासाचार्य वि.का. राजवाडे यांनी 'विचार-विकार प्रदर्शनांच्या साधनांची उत्क्रांती' या लेखात भाषेच्या - बोलीच्या - संवादाच्या निर्मिती प्रक्रियेची केलेली मांडणी त्या दृष्टीने उपयुक्त ठरते. बोलीतून जसे विधायक सुजाण विचार वक्त होतात तसेच निषेधात्मक अथवा अन्य प्रकारचे विकारही प्रदर्शित केले जातात. कारण हा लोकसमूहाच्या जीवनव्यवहाराचा एक भाग असतो. ग्रिअर्सन यांनी भाषेच्या विविध रूपांचा संबंध भारताच्या विविधतेशी मांडलेला दिसतो. ग्रिअर्सन यांनी खानदेशीचा समावेश गुजरातीत केला आहे. ना.गो. कालेलकरांनी तिला शौरसेनीच्या जवळची ठरवून महाराष्ट्री हे तिचे नंतरचे रूप असल्याचे म्हटले आहे. राजवाडे यांनी महाराष्ट्री लोप पावल्यावर अपभ्रष्ट रूपातील भाषांमध्ये अहिराणी बोलीचा उगम झाल्याचे म्हटले आहे. असे विविध विचार मांडले गेले असले तरी भाषावार प्रांतरचनेत डांगचा प्रदेश गुजरातमध्ये जोडला गेला. खानदेश महाराष्ट्राचाच घटक राहिला. अहिराणी गुजरातीपेक्षा मराठीला ध्वनिरचना, स्वन आणि पदीम आणि लिपी यादृष्टीने जवळची आहे. खानदेशातील सण, उत्सव, परंपरा, लोकदेवता, रूढी आणि लोकभाषा यादृष्टीने त्यातील लोकजीवनाची स्वतंत्र वैशिष्ट्ये आहेत. अहिराणी बोलीचे स्वतंत्र अस्तित्व, तिची उच्चार प्रक्रिया आणि मौखिक परंपरा यांमुळे तिला बोलीभाषेचा दर्जा आहे. म्हणून खानदेश या भूप्रदेशाचा, इतिहासाचा, संस्कृतीचा, अहिराणी आणि तिच्या सोबतच्या इतर बोलींचा लोकतत्त्वीय विचार हा स्वतंत्र अभ्यासाचा विषय ठरतो. तौलनिकदृष्ट्या साम्यस्थळांचा आणि भेदस्थळांचा अभ्यास भाषिक लोकतत्त्वाच्या आधारे करता येतो. पूर्व खानदेश आणि पश्चिम खानदेशासह सातपुड्यातील आदिवासींच्या सर्वच विविध बोलींच्या अभ्यासाचे क्षेत्र त्यामुळे व्यापक होत जाते.

**भाषा आणि लोकतत्त्व :**

'Folklore' या इंग्रजी शब्दासाठी आता 'लोकसाहित्य' हा पारिभाषिक शब्द म्हणून रूढ झालेला आहे. लोकवाङ्मयापेक्षा त्याचे अस्तित्व अधिक व्यापक आहे. 'Folk' यासाठी 'लोक' हे पद आणि 'lore' यासाठी 'साहित्य' (केवळ वाङ्मय नव्हे.) हे पद निश्चित मानले जाते. 'साहित्य' या शब्दासाठी शाब्द आणि शारिर स्वरूपाच्या सर्व पारंपरिक बाबींना गृहीत धरले जाते. पिढ्यान् पिढ्या चालत आलेल्या रूढी, मौखिक आविष्कार, सजीव अवशेष, भौतिक (वस्तुरूप) सांस्कृतिक, मानसिक तसेच पुरातत्त्वीय अवशेषांना लोकसाहित्याच्या अंतर्गत स्थान दिले जाते. त्याला एक व्यापक अर्थ असतो. परंपरेने चालत आलेल्या जीवन आचरणात जुन्यातले जुनेही आणि नव्यातले नवेही जे काही असते ते 'लोकतत्त्व' असते. त्यामुळे लोकसमूहाच्या अंतर्गत वावरणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या मनात, आचरणात, उच्चारात म्हणजे त्याच्या

जडणघडणीत ‘लोकतत्त्व’ असते. भाषा-बोली हा अशाच जडणघडणीचा प्राचीन तसेच नव्या स्वरूपाचा लोकतत्त्वीच घटक म्हणून समाजात रूढ होत असतो. लोकतत्त्वीय आचार, रूढी, परंपरा आणि जीवन-व्यवहारातील संदेशाच्या व संस्कृतीच्या जडणघडणीत भाषेचा फार मोठा वाटा असतो. मौखिक आणि कृतिशील अशा सर्व आविष्कारांचा अविभाज्य संबंध लोकसमूहाच्या जीवनाशी, त्याच्या भाषिक संरचनेशी म्हणून बोली-भाषा ही ‘लोकतत्त्व’ म्हणून साकारते. बोलींचा निर्देश प्रदेशवाचक, जातवाचक, राष्ट्रवाचक, कूळ (मानववंश) वाचक, स्थळवाचक, संकेतवाचक अशा भिन्न स्वरूपांत असतो. पुण्याची चित्पावनांची, सातारची मराठ्यांची, माहिमची कोळ्यांची, कोकणातील कोकणी, खानदेशातील खानदेशी (अभीरांची-अहिराणी), विदर्भातील वऱ्हाडी, झाडीपट्टीतील झाडीबोली, लेवा पाटीदारांची लेवापाटीदारी, राष्ट्राची भाषा हिंदी, वैदिकांची भाषा संस्कृत, इंग्रजांची इंग्रजी, अरबांची अरबी अशी विविध स्वरूपाची जडणघडण ही त्या त्या लोकसमूहाची लोकतत्त्वीय निदर्शक असते. बोलीला ‘लोकभाषा’ हा नवा शब्द हळूहळू रूढ झालेला दिसतो. जसे लोकांचे गीत ते लोकगीत, लोकांचे नृत्य ते लोकनृत्य, लोकांचा विधी तो लोकविधी यानुसार लोकांची बोली ती लोकबोली (लोकभाषा) असते. विशिष्ट वैशिष्ट्यांनी जगणाऱ्या लोकसमूहाची बोली संबोधली जाते. लोकसंस्कृतीची भाषा ही जनसमूहाची बोलीच असते. मौखिक, शाब्द आविष्कारांना, ध्वनि-उच्चारांना भाषिक रूपातून समाज जीवनात टिकवून धरले जाते. ही भाषिक संस्कृतीच असते. लोकोक्ती, म्हणी, वाक्प्रचार ही अशा लोकभाषेची निर्मिती असते. भाषा ही अशा मौखिक लोकतत्त्वाची वाहक असते म्हणजेच ती संस्कृतीचीही वाहक असते. त्यातूनच लोकवाङ्मय, लोकपरंपरा जतन केल्या जातात. लोकभाषेतून त्या त्या प्रदेशातील, समूहातील, लोकांच्या मौखिक-अलिखित साहित्याचा फार मोठा संचय टिकून असतो. त्यातील लोकभाषेची दोन ठळक वैशिष्ट्ये दिसून येतात.

(१) उपलब्ध मौखिक साहित्यातील कालतत्त्व, रचनातत्त्व या संदर्भातील नोंदींच्या परंपरागत आविष्काराचे साधन.

(२) निर्माता समूह, लोकसंस्कृती, भूप्रदेश, कूळ (मानववंश), मानसशास्त्रीय जडणघडण, जीवनव्यवहार इत्यादींचे जतन.

उपरोक्त बाबींतून मौखिक लोकतत्त्व या दृष्टीने भाषाभ्यास हा आधुनिक संशोधनात महत्त्वाचा घटक ठरतो.

**भारतीय भाषा आणि लोकतत्त्वीय अभ्यास**

भारतीय पातळीवर लोकसाहित्याचे जे संकलन, संपादन आणि संशोधन झाले

त्यातील ठळक नोंदी लक्षात घेतल्यावर त्यांचा संबंध भाषा आणि लोकतत्त्व या दृष्टीने लक्षणीय ठरतो.

- जॉर्ज ग्रिअर्सन – द लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया
- कर्नल टॉड – राजस्थानी रूढी, परंपरा आणि पुरातत्त्व
- जे. एबर – पंजाबी लोकगीते
- मिस मेरी फ्रिअर – दक्षिण भारतीय लोककथा - द ओल्ड डेक्कन डेज्
- चार्लस् इ ग्रोवर – फोक साँग्ज् ऑफ सदर्न इंडिया
- डाल्टन – एन्थोलाजी ऑफ बेंगॉल
- लालबिहारी डे – फोकलोअर ऑफ बेंगॉल
- रिचर्ड टेंपल – लेजंड्स ऑफ पंजाब
- श्रीमती स्टील – वाईल्ड अवेक स्टोरीज्
- नटेशशास्त्री – फोकलोअर इन सदर्न इंडिया
- इ.जे. रॉबिन्स – टेल्स ॲन्ड पोएम्ज् ऑफ साऊथ इंडिया
- जार्ज ग्रिअर्सन – बिहारी फोक्साँग्ज्/भोजपुरी फोकसाँग्ज्
- विल्यम क्रूक – पॉप्युलर रिलीजन ॲन्ड फोकलोअर ऑफ नॉर्दन इंडिया
- राम गरीब चौबे – नॉर्थ इंडियन नोटस् ॲन्ड क्युरीज्
- हिरालाल – द ट्राईब्ज् ॲन्ड कास्टस् ऑफ सेंट्रल प्रॉव्हिन्स इन इंडिया. (४ खंड)

डॉ. दिनेशचंद्र सेन (बंगाल), – रायबहादूर शरदश्चंद्र राय (बिहार), पं. राम नरेश त्रिपाठी (उ.प्र.), झवेरचंद्र मेघाणी (गुजराथ), देवेंद्रनाथ सत्यार्थी, वासुदेवशरण अग्रवाल, धर्मानंद कोसंबी अशा कितीतरी अभ्यासकांनी भारतीय भाषांतील, विविध प्रदेशांतील, लोकवाङ्मय आणि मौखिक सामुग्री यांचे संकलन, संपादन, संशोधनाचे महत्त्वपूर्ण कार्य केले. विशेषत: विविध भारतीय भाषांमधील हे कार्य भाषा आणि त्यातील लोकतत्त्व अशा स्वरूपात झाले आहे.

**महाराष्ट्रातील भाषा आणि लोकतत्त्वीय अभ्यास :**

मराठी भाषेतून महाराष्ट्राच्या पातळीवर तिच्या विविध बोलींसह झालेले मौखिक लोकसाहित्याचे संकलन, संपादन व संशोधन विविधांगी असेच आहे. त्याचा मागोवा घेता काही ठळक उदाहरणांतून या लोकतत्त्वीय अभ्यासाची विविधता, वेगळेपणा आणि भाषिक, सामाजिक, सांस्कृतिक जडणघडणीचा विचार करता येतो. या प्राचीन मौखिक बोलींच्या लोकतत्त्वाचा अंदाज व व्यापकता लक्षात घेण्यासाठी ठळक नोंदींचा उल्लेख सहज अवलोकन करता येईल.



अनुक्रमणिका

- स.का. छत्रे – इसापकथा (भाषांतर)
- राजारामशास्त्री भागवत – गोंडी भाषा व गीते
- गो.ग. लाड – लौकिक दंतकथा (भाषांतर)
- वि.का. राजवाडे – सज्जन गडावरचे लोकगीत
  सूर्यनारायणाची कहाणी - सूर्यव्रत
- ना.गो. चापेकर – बदलापूरचे लोकसाहित्य
- शं.गो. दाते – लोककथा
- साने गुरुजी – स्त्री-जीवन
- कमलाबाई देशपांडे – अपौरुषेय वाङ्मय
- ना.रा. शेंडे – लोकसाहित्य संपदा
- दा.गो. बोरसे – ताफीत रंग, खानदेश वाग्वैभव, अहिराणीची कूळकथा, अहिराणी लोकसाहित्याचा अभ्यास
- ना.गो. नांदापूरकर – माहेरचे मराठी, मराठीचा मोहोर
- दुर्गा भागवत – लोकसाहित्याची रूपरेखा
- रा.चिं. ढेरे – लोकसंस्कृतीचे उपासक, खंडोबा
- सरोजिनी बाबर – जनलोकांचा सामवेद, बाळराजा, लोकसाहित्य, साजशिणगार, जा माझ्या माहेरा, इत्यादी.
- डॉ. प्रभाकर मांडे – लोकसाहित्य स्वरूप, लोकरंगभूमी, इत्यादी.
- डॉ. भाऊ मांडवकर – कोलाम आदिवासींचे लोकसाहित्य
- विनायक तुमराम – आदिवासी साहित्य

अशी असंख्य वैशिष्ट्यपूर्ण संकलने, संपादने मराठीत झाली आहेत. लोकवाङ्मय, लोकोक्ती, म्हणी, लोककथा, शब्द आविष्कार त्या त्या प्रादेशिक बोलीतील हे सर्व लोकतत्त्व आहे. मराठीची प्रमाणभाषा, बोलीभाषा (लोकभाषा) आणि त्यातील हा पारंपरिक लोकतत्त्वांचा आविष्कार लक्षात घेता हे संशोधनाचे कार्य बहुआयामी आहे. विद्यापीठीय अभ्यासक्रम, शोधप्रबंध, अशा माध्यमांतून बोलींचा अभ्यास, लोकतत्त्व, समाज-भाषा, आविष्कार-पद्धती, रचनानुसारी, संदर्भान्वयी, हेतुकथावादी, निसर्गरूपकवादी इत्यादी दृष्टीने होत आहे. आधुनिक अभ्यासात समाजभाषा-वैज्ञानिकदृष्ट्या होणाऱ्या अशा लोकतत्त्वातून मानववंश इतिहास, मानसशास्त्र आणि त्याचबरोबर ऐहिक (इहतत्त्व) अशा दृष्टीनेही या अभ्यासाचे महत्त्व वाढले आहे. अशा अभ्यासातून धर्म, संस्कृती, राष्ट्र आणि भाषांचे त्या संदर्भातील योगदान यांचा मागोवा घेऊन राष्ट्रउभारणी आणि वैश्विक मानव्याच्या जाणिवा विकसित होत आहेत.

**खानदेशी बोलीतील लोकतत्त्वीय अभ्यास :**

खानदेशी 'बोली' या प्रदेशाचे लोकतत्त्व ठरते. अहिराणी (अभीर) ही प्रमुख बोली असली तरी तिच्या जवळपास अनेक बोली विकसित असून त्या लोकसमूहात प्रचलित आहेत. अहिराणी, भिल्ली, पावरी, मावची, तावडी, लेवापाटीदारी, गुजरी, डांगी, कोकणी, ठाकरी, वारली, घाटोळी, बागलाणी, लाडशिक्की, निभाडी, तडवी, काटोनी, तिरोळी इत्यादी बोली खानदेशात रूढ आहेत. लोकसमूहाच्या लोकजीवनात जी किमान समान वैशिष्ट्ये, लोकतत्त्वीय जडणघडण, विधी, रूढी, परंपरा, लोकगीते, लोककथा, लोकोक्तिनुसार या बोलीभाषा आपापले लोकतत्त्वीय अधिष्ठान पिढ्यान् पिढ्या जपून आहेत. खानदेशीचा 'अहिराणी' हा बोलीनिष्ठ प्रमुख आविष्कार असल्यामुळे अहिराणी लोकसाहित्याचे बरेचसे संकलन, संपादन व संशोधन झालेले आहे. भा.रं. कुलकर्णी, दा.गो. बोरसे, कृष्णा पाटील, राजा महाजन, रमेश सूर्यवंशी, सयाजी पगार, सदाशिवराव माळी, ॲड. उषा सावंत, डॉ. पुष्पा करनकाळ, विजया जडे-सोनार, डॉ. बापू देसाई, डॉ. बी.एन. पाटील, डॉ. किसन पाटील, शालिनी नारखेडे, डी.बी. पाटील, पुष्पा गावित, डॉ. सुधीर कोठावदे, डॉ. सुधा खराटे, डॉ. म.सु. पगारे अशा कितीतरी अभ्यासकांनी हे कार्य परिश्रमपूर्वक केले आहे. खानदेशातील लोकगीते, लोककथा, लोकदैवते, म्हणी वाक्प्रचार, अहिराणी शब्दकोश, अहिराणीचा भाषा वैज्ञानिक अभ्यास, लोकसंस्कृती आणि लोकदैवतांच्या संदर्भातील लोकतत्त्वांचा अभ्यास, इत्यादी दृष्टीने हे कार्य खानदेशी बोलीतील लोकतत्त्वाचा शोध घेण्यासाठी उपयुक्त ठरते.'लोकसाहित्य' या संज्ञेतील केवळ 'लोकवाङ्मय' या अंगाने अधिक संशोधन होत आहे. त्या दृष्टीने 'वाङ्मय' म्हणजे वाणीतून, बोलण्यातून जे उगम पावते, जतन केले जाते, मौखिक अथवा लिखित स्वरूपात ते टिकून राहते, त्याचा अभ्यास हा भाषिक अभ्यास म्हणून महत्त्वाचा ठरतो. त्या लोकतत्त्वीय अभ्यासाला अनेक परिमाणे असतात ती ठळकपणे सोबतच्या आकृतीतून लक्षात घेण्यासारखी आहेत.

**खानदेशी बोलीच्या लोकतत्त्वीय अभ्यासाच्या नव्या दिशा :**

खानदेशी लोकवाङ्मयाचा, लोकसंस्कृती आणि लोककलांचा व्यापक अभ्यास बोलींच्या परिवेशातून करण्यासाठी खूप मोठी संधी उपलब्ध आहे. लोकसमूह, जात, बलुतेदारी, बोली, दैवते, लोककलाविष्कार, समाजभाषाविज्ञानविषयक दृष्टिकोण, ऐहिक जीवन, व्यापार-उद्योग-उदीम, सांकेतिकता, आंतरसांस्कृतिक दृष्टिकोण, विचार-विकार प्रदर्शनाच्या पद्धती, ध्वनिरचना आणि संवादशैली अशा भिन्नभिन्न दृष्टीने नव्या अभ्यासाच्या दिशा सापडतात. बोलींचा परस्पर-अनुबंध, परस्पर प्रभाव, संक्रमणे,




अपभ्रंश रूपे, लोकोक्तींचा प्रभाव, तौलनिक व वैज्ञानिक (भौतिक) दृष्टिकोण यांचा भाषाविषयक दृष्टिकोण नव्या अभ्यासातून तपासणे शक्य आहे. त्यासाठी काही ठळक विषय नव्या अभ्यासासाठी दृष्टिपथात येतात :

- मराठी (प्रमाण) आणि खानदेशी (बोली) यांचा अनुबंध.
- डांगी लोकगीते आणि अहिराणी लोकगीतांचा भाषिक अनुबंध.
- लेवापाटीदार बोली आणि शाब्द लोकवाङ्मयाचा अभ्यास.
- तावडी बोलीतील शाब्द लोकवाङ्मय
- खानदेशातील लोकवाङ्मय आणि ललित वाङ्मयाचा अनुबंध
- भिल्ली, पावरा, मावची, कोकणा, बंजारा, देहवाली इत्यादी बोलींतील लोकवाङ्मय -(आदिवासी लोकसाहित्य अभ्यास)
- खानदेशी लोकनाट्य (भवाडा) जडणघडण-संवाद आणि बोली भाषा यांचा अभ्यास
- खानदेशातील शिव्या, अपशब्द, लोकोक्ती इत्यादींचा समाजभाषावैज्ञानिक अभ्यास
- अहिराणीचा संस्कृत-प्राकृत, गुजराती, निमाडी, कानडी अशा भाषांशी अनुबंध-प्रभाव-संक्रमणाचा अभ्यास.
- खानदेशी बोली आणि कृषि-संस्कृती यांचा लोकतत्त्वीय अनुबंध.
- लोकतत्त्वीय दृष्टीने वऱ्हाडी आणि खानदेशी बोलींचा तौलनिक अभ्यास.

- पश्चिम खानदेश आणि पूर्व खानदेशातील समाज, लोकवाङ्मय, बोलीभाषा यांचा भाषा भौगोलिक अभ्यास.
- खानदेशी बोलीतील पुरुषतत्त्व, स्त्रीतत्त्व यांचा भाषिक अनुबंध (साहचर्य-विरोधाभास)
- खानदेशातील लोकधारणा, लोकभ्रम, लोकश्रद्धा, लोकविश्वास यांचा बोलीतील आविष्कार.

अशा विविध दृष्टींनी नव्या संशोधनाच्या काही वाटा निश्चित करून खानदेशी बोली आणि लोकतत्त्व यांचा अभ्यास करता येईल.

**समारोप :**

- भाषा हे एक बोलीरूप, लोकभाषारूप असे लोकतत्त्व असते. त्यामुळे समूहांतर्गत लोकपरंपरा जतन करण्याचे कार्य होत असते. मराठी आणि तिच्या बोलींतून असे लोकतत्त्व पारंपरिक शाब्द-शारीर अशा दोन्ही दृष्टीने जपले गेले आहे.
- खानदेशातील विविध बोली, ( अहिराणीसह ) आपापली लोकतत्त्वीय भूमिका, लोकभाषा यादृष्टीने पार पाडत आहेत. त्यातील विपुल लोकसाहित्य व त्याचे लोकतत्त्वीय घटक यांचा विपुल साठा या प्रदेशात बोलींनी जतन केलेली आहे.
- भारतीय भाषा, महाराष्ट्रीय भाषा, खानदेशी बोली यातून भाषिक, भौगोलिक, ऐतिहासिक, सांस्कृतिक, सामाजिक जडणघडण परंपरेने जतन झाली असून त्या त्या मौखिक बोली लोकवाङ्मयाचे संकलन, संपादन, अभ्यास (संशोधन) अनेकांनी केलेला आहे. त्याचे लिखित प्रकाशित साहित्य बोलींच्या आधुनिक अभ्यासाची सामुग्री ठरते. त्या अभ्यासाच्या भारतीय, महाराष्ट्रीय आणि प्रादेशिक बोलीनिविष्ट परंपरा कार्य करीत असून क्षेत्रीय व स्तरीय पातळीवर हे कार्य भाषिकदृष्ट्या महत्त्वाचे ठरते. भारतीय, पाश्चिमात्य अभ्यासकांचे हे कार्य नव्या संशोधनाला प्रेरक असून नव्या दिशा दिग्दर्शित करणारे आहे.

**संदर्भ-ग्रंथ सूची :**

कालेलकर ना.गो. - 'भाषा : इतिहास आणि भूगोल', मौज प्रकाशन, मुंबई आ.३, २०००.

गिमेकर परशुराम - (संपा.) 'लोकधाटी-लोकपरंपरा' (डॉ. शरद व्यवहारे गौरव-ग्रंथ), स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, लेख : लोकतत्त्व आणि इहतत्त्व (डॉ. किसन पाटील)

पाटणकर डॉ. जयश्री - (संपा.) 'सामाजिक भाषा विज्ञान ; कक्षा आणि अभ्यास', ससंदर्भ प्रकाशन, नाशिक, २००५.

पाटील कृष्णा - 'अहिराणी लोकसाहित्य दर्शन (सण-उत्सव)', मेहता पब्लिशिंग

हाऊस, पुणे, १९८३.
बोरसे डॉ. दा.गो. - (१) 'अहिराणी लोकसाहित्याची वैशिष्ट्ये', १९८९, (२) 'अहिराणी भाषा परिचय', गिरीजा प्रकाशन, नागपूर.
मांडे डॉ. प्रभाकर - 'लोकसाहित्याचे स्वरूप', गोदावरी प्रकाशन, औरंगाबाद, आ.४, २०००.
राक्षे डॉ. वासंती - 'गदिमा साहित्य आणि लोकतत्त्व', गोदावरी प्रकाशन, औरंगाबाद, २००३.
वरखेडे डॉ.र.ना. - 'समाजभाषा विज्ञान : प्रमुख संकल्पना', रत्नदीप प्रकाशन, फैजपूर, १९९२.
शहा डॉ. मु.ब. - (संपादक) 'खानदेशचा सांस्कृतिक इतिहास', खंड-१/२/४, का.स. वाणी म.प्र.अ. संस्था, धुळे, २००४.
सूर्यवंशी डॉ. रमेश - 'अहिराणी - भाषा वैज्ञानिक अभ्यास' अक्षय प्रकाशन, पुणे, १९९७. ■

प्रमुख अधिष्ठाता, कलाविद्या शाखा, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव.

## लेखकांसाठी सूचना

१. पुढील विषयांसंबंधीचे लेखन ''भाषा आणि जीवन''ला हवे आहे : मराठी व अन्य देशी-विदेशी भाषा, भाषाविज्ञान, भाषांतर, संशोधन, शैली, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय इ० धोरणे, 'भाषा आणि जीवन'मधील लेखांसंबंधीच्या प्रतिक्रिया, पानपूरके.

२. लेखकांनी पुढील पथ्ये पाळावीत :

(अ) कागदाच्या एकाच बाजूस, सुवाच्य लिहावे.

(आ) लेखनाच्या पाकिटावर पुरेशी टपाल-तिकिटे लावावी.

(इ) लेखाच्या अखेरीस स्वतःची ओळख (शिक्षण, व्यवसाय इ०) एकदोन वाक्यांत लिहावी. त्याचप्रमाणे स्वतःचा पत्ता व ( इष्ट वाटल्यास ) दूरध्वनी क्रमांक द्यावा. (संपादकांच्या सोयीसाठी दूरध्वनी क्रमांक जरूर कळवावा.)

(उ) लेखात इंग्रजी अवतरणांचे मराठी भाषांतर द्यावे. व्यक्तिनामे, ग्रंथांची व लेखांची शीर्षके इ० देवनागरीत लिहावी. (अतिशय अपरिहार्य अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा.)

३. लेखनासंबंधीचा निर्णय एक ते तीन महिन्यांत कळवला जातो. टपाल-तिकिटे जोडलेली असतील तर (आणि तरच) नापसंत लिखाण परत पाठवले जाते.

४. लेखनाला अल्प मानधन दिले जाते.

# नायगावकरांची 'औदुंबर' कविता : संहिता-विशेष

डॉ. शिवाजी विष्णू पाटील

**औदुंबर**

आसमंतात सर्वत्र सल्फरचा गंध
माथ्यावर
संथपणे आकारणारे काळपट ढग
दुतर्फा
गच्च झोपड्यांच्या खोबणीत
मख्ख डांबरी रस्ता

पेट्रोलचा खमंग वास चाखत
जिथे
ड्रेनेजचे महाद्वार
महासागराशी
हितगुज करते
त्या तेजस्वी
काळ्याभोर पाण्यात
औदुंबराचा
पाय फसला

- **अशोक नायगावकर**

('वाटेवरच्या कविता', ग्रंथाली प्रकाशन, दादर(प.), मुंबई २८, प्रथमावृत्ती १९९२)

अशोक नायगावकर हे प्रामुख्याने महानगरीय संवेदना मांडणारे कवी म्हणून प्रख्यात आहेत. त्यांच्या 'औदुंबर' या कवितेतून यंत्रयुगामुळे मूळचा चेहरा हरवलेल्या निसर्गाचे चित्रण दिसून येते. तिच्या संहितेतील काही पैलूंचा विचार या ठिकाणी मांडावयाचा आहे.

औद्योगिकीकरणामुळे प्रदूषित झालेले वातावरण मानवी जीवनात ताण निर्माण करते, हे आशयसूत्र मध्यवर्ती ठेवून या कवितेची निर्मिती झालेली आहे. 'औदुंबर'



अनुक्रमणिका

या कवितेची रचना मुक्तछंदात असून तिचे दोन विभाग (६+९ ओळी) स्पष्टपणे दिसतात. यातील रूप व वाक्य या स्तरांवरील निवड आशयाशी एकरूपता दर्शविणारी आहे. परिसर-आसमंत-सभोवताल-पर्यावरण-वातावरण-(आसमंत), काळपट-काळसर-काळेकुट्ट-काळानिळा-काळाशार (काळपट), खड्डा-खोबणी-खिंडार(खोबणी), घट्ट-आवळ-गच्च-बळकट(गच्च), विरक्त-मख्ख-उदासीन-गप्प-अविचल(मख्ख) ही निवड अर्थस्तराशी निगडित आहे. 'गच्च', 'मख्ख'सारख्या रूपांतून पक्केपणा गडद केला जातो. 'सल्फरचा गंध' याऐवजी 'गंधकाचा गंध'ची निवड नादाच्या दृष्टीने महत्त्वाची ठरली असती; पण अर्थस्तरावरील उद्विग्नता ठळक होण्यासाठी खटकेबाज रूपे अधिक वापरात आणलेली दिसतात. सल्फर, पेट्रोल, ड्रेनेज, इ० इंग्रजी शब्द औद्योगिक वातावरण उभे करतात. काळपट, डांबरी रस्ता, काळ्याभोर अशी रंगसंवेदना निर्माण करणारी रूपे निसर्गाचे स्वरूप निश्चित करतात. नायगावकरांच्या या कवितेतील सल्फरचा गंध, पेट्रोलचा खमंग वास, ड्रेनेजचे महाद्वार, झोपड्यांच्या खोबणीत इ० रूपांमुळे औद्योगिकीकरणामुळे महानगराला आलेले बकालपण, यंत्रयुगामुळे येणारे प्रदूषण स्पष्ट होण्यास अधिक मदत होते. 'खमंग' हे पेट्रोलचे विशेषण व 'तेजस्वी' 'काळ्याभोर' ही प्रदूषित पाण्याची विशेषणे उपहास दर्शवितात, त्यामुळे वैफल्यग्रस्त मनातील कडवटपणा लक्षात येतो. महाद्वार-महासागर ही महानगराशी संबंधित रूपे आवाका व्यक्त करतात. नाकाला झिणझिण्या आणणारी उग्रता व निसर्गातील चैतन्याचा अभाव असलेली कृत्रिमता व्यक्त करणारी रूपे अंत:स्तराशी जुळणारी आहेत.

नायगावकरांच्या या कवितेच्या पहिल्या भागात (१ ते ६ ओळी) कुठेही क्रियापद दिसून येत नाही. त्यातील सर्व तपशील स्थितिशील, पेंटिंगच्या स्वरूपाचा आहे. त्यामुळे निश्चित असे कालनिर्देशन होत नाही. आसमंतातला न संपणारा सल्फरचा गंध, ढगांचा वाढत जाणारा काळपटपणा, झोपड्यांचे अनिश्चित अस्तित्व यांच्या सोबतीची अटळता क्रियापदाच्या अभावातून सूचित येते. दुसऱ्या भागात (७ ते १५ ओळी) 'करते', 'फसला' ही क्रियापदे आहेत. पैकी पहिले क्रियापद पुन्हा रीतिवर्तमान काळातील असल्यामुळे स्थितिशीलतेच्या जवळचे आहे. फक्त 'फसला'हे विधान करणारे व त्यामुळे स्वत:कडे लक्ष खेचून घेणारे ठरते. त्यात ठामपणा व्यक्त होतो. त्याचबरोबर 'जेथे' स्थितिदर्शक स्थलवाचक विशेषण येते; पण ओळीत नंतर येणाऱ्या 'तिथे'चा अभाव आहे. ('जेथे जातो तेथे तू माझा सांगाती') 'जेथे' नंतर 'तेथे' आल्याशिवाय रचनेची संगती पूर्ण होत नाही. 'तिथे'च्या अभावातून झालेले नियमोल्लंघन अधिक ताण निर्माण करते.

या कवितेत चित्रमालिकांची रचना वेधक ठरणारी आहे. सभोवताली सल्फरचा गंध, माथ्यावर दिसणारे काळपट ढग, दुतर्फा झोपड्यांमधून जाणारा डांबरी रस्ता, पेट्रोलचा खमंग वास, महासागराशी जेथे ड्रेनेज जोडले गेलेले आहे तेथे पाण्याचे बदललेले स्वरूप, पाय फसलेला औदुंबर असे रचनेतील काही घटक चित्रसदृश्य रूपात दिसून येतात. 'औदुंबर'मधील निसर्ग महानगरीय असून औद्योगिकीकरणामुळे तो आपले मूळ रूप हरवून बसल्याचे दिसते. हा प्रदूषित झालेला निसर्ग सगळीकडे दृष्टी फिरवून पाहता येतो. सर्वत्र सल्फरचा गंध, आकाशाचे दर्शन घडू न देणारे काळपट ढग, झोपड्यांच्या आक्रमणामुळे महानगराला आलेला गलिच्छपणा, वाढत्या वाहतुकीमुळे धुराचे साम्राज्य, ड्रेनेजमुळे पाण्याचे प्रदूषण इ० मुळे आधुनिकतेच्या पार्श्वभूमीवरचा निसर्ग मानवी जीव पोखरून टाकतो. मानवी आक्रमणाच्या प्रभावामुळे निसर्गापासून तुटत जाणाऱ्या मानवी मनात व्यस्तता निर्माण होत राहते.

नायगावकरांच्या कवितेतील काही शब्दांतून सूचित झालेला उपहास पाहण्यासारखा आहे. 'महाद्वार' हे देवळाशी, राजवाड्याच्या भव्यपणाशी निगडित आहे. पण येथे ते गटाराशी निगडित केलेले आहे; 'हितगुज' शब्दात हिताची गुप्त गोष्ट, कानगोष्टी अभिप्रेत असून येथे ड्रेनेजचे दार व महासागर यांच्या दरम्यान निर्माण होणाऱ्या प्रचंड धो धो आवाजाशी ते जोडले आहे. त्याचबरोबर 'खमंग' हे विशेषण स्वादिष्ट, रुचकर पण पेट्रोलच्या झणझणीत वासाशी व 'तेजस्वी' - तेजःपुंज, बाणेदार हे विशेषण काळ्याभोर दूषित पाण्याशी जोडले गेल्यामुळे उपहास व उपरोध ठामपणे व्यक्त झालेला दिसून येईल. एकूणच काय की या वातावरणामुळे दिव्य गोष्टींचा आठव होण्याऐवजी निर्माण होणारा तिटकारा शब्द दर्शवितात.

प्रस्तुत कविता वाचताना बालकवींचा 'औदुंबर' आठवणे अपरिहार्य आहे. बालकवींचा निसर्ग निखळ व प्रदूषणमुक्त आहे. तेथे निसर्गसौंदर्याचे पवित्र व निरागस दर्शन घडते. नायगावकरांच्या कवितेतील निसर्ग काळवंडलेला, प्रदूषित, गलिच्छ इ०मुळे रम्यता हरवून बसतो. या दोन्ही कवितांतला विरोध पुढीलप्रमाणे दाखविता येईल :

| **बालकवी** | **अशोक नायगावकर** |
|---|---|
| हरित वातावरण (सौंदर्याचे अस्तित्व) | वातावरणाची वाताहात (सौंदर्याचा अभाव) |
| प्रदूषणविरहीत (पारदर्शकता) | उच्चांकी प्रदूषण (अपारदर्शकता) |
| चिमुकले गाव (सुंदरता) | झोपड्यांच्या खोबणी (कुरूपता) |

| | |
|---|---|
| आडवीतिडवी जाणारी पांढरी पायवाट (सहजता) | रेखीव काळा डांबरी रस्ता (सहजतेचा अभाव) |
| हिरव्या कुरणानंतर दिसणारा काळा डोह (मर्यादित रूप) | महानगरालगत असलेला महासागर (अमर्याद रूप) |
| हरवून जावे असा निसर्ग (समाधान) | फसगत व्हावी असा निसर्ग (असमाधान) |

दोन्ही कवितांत येणारा 'औदुंबरा'चा उल्लेख ही एक महत्त्वाची बाब आहे : पाय 'टाकणारा' आणि पाय 'फसलेला' औदुंबर : नायगावकरांच्या कवितेत डांबरी रस्ता असूनही पाय फसला असल्यामुळे औदुंबर कोठेही जाऊ शकत नाही, असे सूचित केले जाते. बालकवींच्या औदुंबराने आपणहून जळात पाय 'टाकला' आहे. जणू काही तो केव्हाही पाय काढून घेऊन निघून जाऊ शकेल; पण नायगावकरांच्या औदुंबराचा पाय 'फसला' आहे, अडकला आहे. समोर डांबरी सडक असूनही तो कुठे जाऊ शकत नाही, हे वेदना देणारे दु:ख ठरते. बालकवींचा 'औदुंबर' हा निसर्गाच्या पार्श्वभूमीवर मानवी रूपात अवतरलेला असून मानवी जीवनाकडे चिंतनाच्या दृष्टीने पाहण्यास प्रवृत्त करतो. परंतु नायगावकरांच्या कवितेतील 'औदुंबर' वाचकाला शांत चिंतनापासून परावृत्त करतो. हा औदुंबर एकतानता हरपलेला, गुदमरलेल्या वातावरणात क्लेश सहन करणारा आहे. पाय फसण्याची क्रिया ही प्रदूषित वातावरणामुळे मानवी अस्तित्वाचा तोल सांभाळण्याची अशक्यता निर्माण करणारी आहे. त्यामुळे जगण्याचे भान हरपत चाललेला औदुंबर वाचकाच्या मनात प्रश्नचिन्हे उभी करतो. भौतिक प्रगतीसह अटळपणे येणाऱ्या मानवी विनाशाचे चित्रण करण्यात कविता यशस्वी होते.

(प्रा. प्र.ना.परांजपे यांनी या लेखासाठी काही मौलिक सूचना केल्या. त्यांचा उपयोग या ठिकाणी महत्त्वाचा ठरलेला आहे.)

■

**मराठी विभाग, छत्रपती शिवाजी कॉलेज, सातारा ४१५००१.**
**दूरध्वनी (०२१६२) २२२३९१.**
E-mail shipatil@sancharnet.In

# उमज शब्द ब्रह्माची

शरदिनी मोहिते

कित्येकदा कितीतरी थोर तत्त्ववेत्यांनी आणि उच्चकोटीचे दैवी अनुभव घेतलेल्या महाभागांनी शांततेच्या गूढ अमाप सौंदर्याचे, अद्भुत सामर्थ्याचे वर्णन केलेले आहे... ते वाचले, तर आपल्याही मनाला भिडतेच, शिवाय कल्पनाही नसताना आपल्यालाही केव्हा केव्हा त्याचा अनुभव आलेला असतो...

नीरवतेच्या या निराकार, अमूर्त, अद्भुत शक्तीचे महत्त्व आगळेवेगळे असले तरी तिचे दर्शन ही नेहमी व सगळ्यांना लाभणारी गोष्ट नाही. तिचा साक्षात्कार होण्यासाठी विशिष्ट जाणिवा विकसित झालेल्या असाव्या लागतातच, शिवाय स्थलकाल परिस्थितीही त्या त्या प्रकारची असावी लागते...

म्हणजेच या निःशब्दतेच्या अद्भुत सामर्थ्याचे दर्शन ही येता-जाता घडू शकणारी गोष्ट नाही...

याउलट, शब्द, आवाज ही गोष्ट अक्षरशः स्थिरचर व्यापून राहिलेली आढळते. जीवनाचा एक अविभाज्य घटक बनून राहिलेली आढळते. सारे अवकाश शब्दब्रह्माने कोंदून राहिलेले असते...

नव्याने जन्म घेताना ठणकावून रडत मारलेल्या ललकारीपासून, त्याही आधी सुरू झालेल्या हृदयाच्या धडधडीच्या साथीनं, शब्दब्रह्म अखंडपणे आपली साथ करत असतं... कदाचित ती ललकारी आपली आपल्याला देखील ऐकू आलेली असण्याची शक्यता असते. पण जन्म घेतानाची यातायात इतकी दमछाक करणारी असते, की काहीच न सुचणं किंवा नंतरदेखील ते न आठवणं ही अतिशय साहाजिक अशी गोष्ट असते...

आजुबाजूला आवाज उमटतच असतात... कधी लहान आवाजात, कधी मोठ्या आवाजात. आपल्याशीही आपल्याला जणू समजतंयच अशी कल्पना करून सगळे बोलतात ! बाळाच्या आईचा, तिच्या मंगल अंगाईचा तर त्यात सगळ्यात मोठा भाग...

मग कधी तरी समज पडायला सुरुवात होते. ते आवाज, ते शब्द आठवणीत







साठायला लागतात. त्यांचे अर्थही समजायला लागतात. पाळण्याची, झोपाळ्याची कुरकूर, कोणीतरी, शिंकतय, कोणीतरी खोकतय, कोण हसतय, तर कोणी भोकाड पसरलय, कुठंतरी कुत्रं भुंकतय, कुठंतरी मनी 'म्यॉव' करतेय, खिडकीतून येऊन नाचणारी चिमणी चिवचिवतेय, कोंबडा कोकतोय, गाया/बैल किंवा म्हैस हंबरतेय... असे विविध आवाज उमटत असतात, त्यांची कुठेतरी नोंद होत जाते...

घड्याळाची टिकटिक, त्याचे तासाचे टोल, दारावरची घंटा, टेलिफोनची वेगवेगळ्या प्रकारची रिंग, कोणीतरी कोणाला तरी मारलेल्या हाका, कोणी गुणगुणलेले गीत, वाजवलेले वाद्य, रेडिओ, टीव्हीचे आवाज, निरनिराळी गाणी, या व अशा कितीतरी गोष्टी कालांतरानं सवयीच्या होऊन जातात.

पुढे बस, स्कूटर, मोटर इत्यादींचे चालतानाचे, हॉर्नचे वगैरे आवाज, कचकून लावलेले ब्रेक अशा गोष्टी कानांवर आदळायला सुरुवात होते. हेलिकॉप्टर, विमानं अवकाश घुमवून सोडतात... टीव्ही लावला तर कोणत्या ना कोणत्या चॅनेलवर हाणामारीचा स्पेशल पार्श्वसंगीतासह खेळ चालू असतो. फार क्वचित् बाणांचे झुंई असे आवाज ऐकायला मिळतात, ढिश्यूं ढिश्यूं चाललेलं असतं. शिवाय बंदुकांचे, स्फोटांचे, किंकाळ्यांचे, गर्जनांचे आवाज अखंडपणे उमटत असतात. कधी तोफा धडाडतात, कधी बॉंबवर्षाव चालू असतो, स्कडची झेपही थरारून सोडते...

अवताल भवताल पाहिलं तर सागरावर उमटणाऱ्या लाटांनी एखाद्या मंत्राप्रमाणे उच्चारलेली गाज जितकी पकड घेणारी असते, तितकीच झऱ्याची झुळझुळही काळजाला भिडणारी असते... कधी प्रपातांचे रोरावणे, कधी सुसाट वाऱ्याचे घोंगावणे, कधी विजांचा कडकडाट, ढगांचा गडगडाट, पावसाचे सुद्धा कधी कोसळणे, कधी झिमझिमणे... कधी टपोरलेली कळी उमलताना होणारा किंचित् शब्द, तर कधी मोरानं आनंदानं बेभान होऊन नाचण्यासाठी आपला मिटलेला पिसारा झपकन उघडताना झालेला प्स...फर्रर्र असा क्षणार्ध प्रकटलेला आवाज अशा कितीतरी गोष्टी निसर्गाचा जातिवंत प्रत्यय सतत देताना आढळतात. मोराची केकावली, कोकिळाने पकडलेला पंचम, किंवा वानरांची हूपहूप, हत्तींचे चित्कार, घोड्यांचे खिंकाळणे, वनराजानं फोडलेल्या डरकाळ्या या गोष्टी तशा पुष्कळदा ऐकायला मिळू शकतात...

...पण अचानक होणारे धरणीकंप, किंवा ज्वालामुखींचे रौद्र उद्रेक यांची भाषा किती उग्र असते यांचाही अनुभव माणसानं घेतलेला आहे...

सुकुमार राय यांनी म्हटल्याप्रमाणे 'ॐ' शब्द पहा... प्रणवध्वनी निर्माण झाला नसता, तर सृष्टी घडली असती का ?... ''शब्दात सृष्टी, शब्दात स्थिती आणि शब्दात प्रलय'' अशी स्थिती खरोखरच आहे...

त्यातही विशेष म्हणायचं म्हणजे एक अशी विलक्षण गोष्ट आहे की उमटलेले हे सर्व नाद अथांग अपार अवकाशानं जतन करून ठेवलेले आहेत... ब्रह्मांडात उमटलेले हे पूर्वापारपासूनचे ध्वनिमुद्रण हस्तगत करणं माणसाच्या प्रतिभेला कधी ना कधी शक्य होईल हा विचार मात्र मनात वरचेवर चमकून जातो...

...खरंच असं काही घडलं, तर केवढं आणि किती अद्भुत आश्चर्य घडेल... काळाच्या ओघात हातातून निसटलेलं ज्ञान पुन: मिळू शकेल, हा फारच मोठा लाभ होईल... शिवाय विविध विशेष घटनांमधली आपल्याला अज्ञात असलेली काही गुपितंही हाती लागतील, अशी शक्यता आहेच. अतिशय शक्तिमान मंत्रांचा नानाविध ज्ञानमौक्तिकांचा उगम कळेल, विविध घंटा-घंटिकांचे नाद खचितच काही ना काही सांगतील यातही शंका वाटत नाही...

मुरलीधराच्या मुरलीचा नाद सारं आसमंत नवचैतन्याने उजळवेल... त्याच्या गीतेचं गान आजच्याही अर्जुनात उल्हास आणि वीरश्री भरून टाकेल कालिदासादिकांच्या प्रतिभेचा विलास आपलीही दाद पुन: मिळवून जाईल... पैसच्या पुढे बसून ज्ञानरायांनी सांगितलेली ज्ञानेश्वरी पुन: ऐकताना कदाचित सच्चिदानंद बाबांच्याकडून चुकून निसटलेला एखादा सुंदर शब्द भेटून जाईल... नामदेव तुकारामांच्या कीर्तनांनी आपणही धन्यतेनं डोलू लागू... किती किती काय काय घडेल सांगता तरी येईल का कोणाला ? शब्दब्रह्माच्या साक्षात्काराची उमज आधी तरी पडावी कशी बरं ? ■

ए-१/४, शरयू, सरितानगरी, फेज २, सिंहगड रोड, पुणे ४११ ०३०.

**प्रगत वाचन पद्धती**

फलटणच्या कमला निंबकर बालभवनात वाचन-लेखन सुधार प्रकल्प हा डॉ. मॅक्सिन बर्नसन (संचालिका, प्रगत शिक्षण संस्था) यांच्या भाषाशास्त्राच्या अभ्यासावर आधारित असणाऱ्या 'प्रगत वाचन पद्धती'चा उपयोग करून राबवला जातो. बहुसंख्य भारतीय भाषांमधील मुळाक्षरे व स्वर यांची उच्चारांशी असणारी एकास-एक सांगड हे त्याचे मूळ तत्त्व आहे. प्रगत वाचन पद्धतीच्या 'आपण वाचू या' या पहिल्याच धड्यापासून स्वरचिन्हांचा वापर आहे. स्वरचिन्हांच्या ओळखीमुळे मुलांचे शब्दभांडार एकदम कित्येक पटींनी वाढते. वाक्येही अधिक अर्थपूर्ण होतात.

मंजिरी निमकर, 'साक्षरता हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे', - 'जीवन-भाषा-शिक्षण', 'पालकनीती',दिवाळी, २००५', पृ.१००-१०१.

# इंग्रजीची छाप नसलेले पहिले मराठी व्याकरण

मुंबईच्या मराठी संशोधन मंडळाचे संचालक श्री. अनंत काकबा प्रियोळकर यांनी हे पुस्तक प्रसिद्ध करून मराठीच्या व्याकरणविषयक संशोधनात मोलाची भर घातली आहे. १८२५च्या सुमारास जगन्नाथशास्त्री क्रमवंत, गंधारशास्त्री फडके आणि बाळशास्त्री घगवे यांनी हे व्याकरण रचले. नेटिव एज्युकेशन सोसायटीचे एक अधिकारी जारवीस साहेब यांनी हे व्याकरण रचण्याविषयी या तीन पंडितांस आज्ञा केली. तेव्हा त्यांना असा विचार पडला, की मराठी भाषेचे व्याकरण कसे रचावे? मराठी भाषा संस्कृताश्रित आहे म्हणून त्यांनी संस्कृत व्याकरणाच्या धर्तीवरच हे व्याकरण तयार केले.

विद्यार्थी या व्याकरणाच्या हस्तलिखित प्रती तयार करीत आणि त्यावरून व्याकरणाचे अध्ययन करीत, कारण हे व्याकरण छापले गेलेले नाही. त्याची हस्तलिखित प्रत कोणीतरी इंग्लंडमध्ये नेली. श्री. प्रियोळकर यांनी या व्याकरणाची मायक्रोफिल्म नक्कल इंग्लंडमधून मागविली आणि (कै.) माडगावकर यांच्या विश्वस्तांनी संशोधक मंडळाकडे जे दहा हजार रुपये दिले, त्याच्या व्याजातून प्रस्तुत पुस्तक प्रसिद्ध केले आहे.

**इंग्रजी व्याकरणाची छाप नाही**

(कै.) दादोबा पांडुरंग यांनी आपले व्याकरण १८३६मध्ये प्रसिद्ध केले; पण त्यांना या तीन पंडितांच्या व्याकरणाची दादही नव्हती, असे त्यांच्या प्रस्तावनेवरून दिसते. दादोबांच्या व्याकरणावर इंग्रजीची छाप पडलेली आहे, पण प्रस्तुत व्याकरणाचा तसा प्रकार नाही, म्हणून या पुस्तकाला 'मराठी भाषेचे आद्य व्याकरण' असेच म्हटले पाहिजे. त्यात नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद यांना नाऊन, प्रोनाऊन, ॲड्जेक्टिव्ह व व्हर्ब असे इंग्रजी प्रतिशब्द एका ठिकाणी दिलेले आढळतात; पण ते मागाहून कोणीतरी लिहिलेले असावेत, असे श्री. प्रियोळकरांचे मत आहे, ते बरोबर दिसते. कारण इतर सर्व रचना संस्कृत व्याकरणाला धरूनच केलेली आहे. उदाहरणार्थ, संस्कृतात समासाचे सहा प्रकार मानतात, तसे यातही मानलेले आहेत. तृतीया तत्पुरुषाची दोन उदाहरणे फार गमतीची आहेत. पोटाने म्हातारा तो पोटम्हातारा. हाताने खुर्पिजे ते हातखुर्पे.

**धातुसाधितास क्रियानाम शब्द**

धातुसाधित नामास 'क्रियानाम' असा शब्द त्यांनी योजला असून, तो अन्वर्थक होय. तसेच 'नामविशेषण' असा शब्द त्यांनी वापरला आहे. 'क्रियानाम' आणि 'नामविशेषण' हे शब्द आजही आपणास योजता येण्यसारखे आहेत. विद्यार्थ्यांना त्याचा चटकन बोध होईल. 'च' आणि 'ज' यांचे दन्त्य आणि दन्त्यतालव्य हे मिश्र भिन्न उच्चार भिन्न भिन्न गुणांनी या पुस्तकात दाखविले आहेत. ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. अर्वाचीन काळात मराठी भाषेचे हे पहिलेच व्याकरण आहे. प्राचीन काळातील मराठी व्याकरणाचा विचार केला तर भीष्माचार्य या महानुभावी ग्रंथकाराचे नामविभक्ती, पंचवार्तिक हे ग्रंथ व गिरिधरस्वामीचे त्रुटित स्वरूपातील व्याकरण, एवढेच ग्रंथ आढळतात

अर्वाचीन मराठीतील या पहिल्या व्याकरणाच्या हस्तलिखिताची १५३ पृष्ठे असून, आकार १२॥ स ७॥ आहे. प्रत्येक पृष्ठाला २९ ओळी आहेत. त्याकाळचे स्वर व व्यंजने लिहिण्याची काही अक्षरे अगदी निराळी होती, हे या हस्तलिखितावरून दिसते. च व ज या अक्षरांचा तालव्य, दंततालव्य, असा दोन प्रकारे उच्चार मराठीत होतो. हा भेद दर्शविण्यासाठी त्यांच्या स्वाभाविक रेषेच्या आरंभी बिंदू देण्याची पद्धत होती. उदा० (सम.ज, चा.करी) छ चा दंततालव्य उच्चार-'स' या अक्षराने व झ चा दंततालव्य उच्चार दर्शविताना त्याच्या पोटात बिंदू देत.

मुंबईची हैंदशाळा पुस्तक मंडळी १८२२मध्ये स्थापन झाली. तिने व्याकरण, कोश व इतर पाठ्यपुस्तके तयार करण्याचे कार्य आरंभिले, त्या वेळी सोसायटीच्या नोकरीतील पंडितांनी जे व्याकरण तयार केले, तेच हे मराठीचे पहिले व्याकरण. या व्याकरणाची हस्तलिखिताची एक प्रत इंग्लंडमध्ये इंडिया ऑफिसमध्ये गेली नसती तर आपण मराठीतील या आद्य व्याकरणाला मुकलो असतो; पण हस्तलिखित इंडिया ऑफिसमध्ये कसे गेले ? हैंदशाळा मंडळीचे पहिले सेक्रेटरी डॉ. टेलर यांनी आपल्या जवळच्या संस्कृत व मराठी हस्तलिखितांचा संग्रह 'नेटिव पब्लिक लायब्ररी' स्थापण्यासाठी दिला होता. इंडिया ऑफिसमध्ये बरीच हस्तलिखिते जॉन टेलर यांच्या संग्रहातील म्हणून नमूद आहेत. ती याच 'नेटिव्ह पब्लिक लायब्ररी'मधील असावीत, असा श्री. प्रियोळकर यांचा अंदाज आहे.

पुस्तकास डॉ. सुनीतीकुमार चतर्जी यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेत सुरवातीच्या बंगाली व्याकरणासंबंधी माहिती दिली आहे. विल्यम कॅरीने लिहिलेले बंगाली व्याकरण १८१६मध्ये प्रसिद्ध झाले. राजा राममोहन राय यांनी १८२६मध्ये आपले बंगाली व्याकरण इंग्रजीत प्रसिद्ध केले. त्याचेच बंगाली भाषांतर पुढे इंग्लंडमध्ये त्यांच्या

निधनानंतर १८३३मध्ये प्रसिद्ध झाले. यावरून एकाच काळात मराठीप्रमाणेच इतर भाषांतही व्याकरणे रचण्याचे प्रयत्न कसे चालू होते याची कल्पना येते. या पुस्तकाला श्री. प्रियोळकर यांनी मराठीत आणि श्री.सुनीतीकुमार चतर्जी यांनी इंग्रजीत लिहिलेल्या प्रस्तावना संशोधनाच्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत. मराठी भाषेच्या व्याकरणाचा ज्याला सखोल अभ्यास करावयाचा असेल त्याने हे पुस्तक अवश्य वाचलेच पाहिजे, अशी या पुस्तकाची महती आहे. ■

**इंडिया ऑफिसमधील हस्तलिखित प्रतीवरून एकशेतीस वर्षांनी प्रकाशित महाराष्ट्र भाषेचे व्याकरण : संपादक अ.का.प्रियोळकर, मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई नं. २,**
**पृष्ठे : १२८, किंमत : चार रुपये,**
**दै. 'सकाळ' ३-७-०५**

पॉल, ब्रोका, हा एक फ्रेंच शास्त्रज्ञ होता. साधारण दीड शतकापूर्वी त्यानं भाषांविषयीच्या आपल्या ज्ञानाचं, त्या ज्ञान भांडाराचा वापर करण्याच्या क्षमतेचं नियंत्रण करणारं मेंदूतलं केंद्र शोधून काढलं आणि म्हणूनच मेंदूच्या त्या भागाला 'ब्रोक्राज ब्रेन' असं म्हटलं जातं. मेंदूच्या या क्षेत्राच्या जवळच; पण त्यापासून निश्चितपणे वेगळ्या असणाऱ्या एका क्षेत्राचा शोध जर्मन शास्त्रज्ञ वेर्निके यानं लावला. त्याला 'वेर्निकेचं क्षेत्र' असं म्हटलं जातं. ते व्याकरणाच्या ज्ञानाचं आणि त्याचा वापराचं नियंत्रण करतं.

आपण जेव्हा एखादी भाषा शिकतो, म्हणजे मूल लहान असताना त्याची मातृभाषा बोलायला शिकतं, तेव्हा मेंदूच्या या भागात काही कायमस्वरूपी बदल होऊ लागतात. म्हणजे समजा आपल्या घरात नव्यानंच विजेचं कनेक्शन मिळालं, की तिचा वापर करण्यासाठी जसं एक जाळं बसवावं लागतं, ठिकठिकाणी दिवे, पंखे, त्यांचं नियंत्रण करणारी बटनं बसवावी लागतात, ही सगळी तारांनी एका जाळ्यात जोडून टाकावी लागतात, तशी आपल्या मज्जातंतूची जाळी तयार होतात. ही जाळी कायमची, आयुष्यभर टिकतात. वयोमानानुसार ती कदाचित कमकुवत होत असतील, पण नष्ट होत नाहीत. तर अशा प्रकारची जाळी या ब्रोकाच्या आणि थोड्याफार प्रमाणात वेर्निकेच्या क्षेत्रातही वसवली जातात.

**डॉ. बाळ फोंडके** 'भाषाकोश', विज्ञान प्रपंच (२००५)
मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, २००५, पृ. १२४,१२५.

**पुस्तक-परीक्षण**

# मराठी अशी लिहावी ?

सुमन बेलवलकर

[परीक्षित पुस्तक : 'माय मराठी.. कशी लिहावी.. कशी वाचावी', दिवाकर पुरुषोत्तम मोहनी, लिपिरूपदा प्रकाशन, पुणे ४, १ मे २००५, पृष्ठे ४४, किंमत रु. ३०]

मराठी भाषेला मुद्रणाचा संस्कार सर्वप्रथम सेरामपूर येथे १८०५ साली झाला. तेव्हापासून मराठी भाषा आणि लिपी यांच्यातील बदलांची, लेखनमुद्रणाची चर्चा चालत आली आहे. मराठीचे लेखन, विशेषत: शुद्धलेखन हा कितीतरी व्यक्तींच्या चिंतनाचा, जिव्हाळ्याचा विषय असतो आणि हे लोक आपली मते मोठ्या कळकळीने तर कधी आग्रहपूर्वक मांडत असतात. श्री. दिवाकर मोहनी यांची 'माय मराठी.. कशी लिहावी... कशी वाचावी' ही छोटेखानी पुस्तिका मराठीच्या वाचकांनी, मुद्रकांनी दखल घ्यावी अशी आहे.

या पुस्तिकेत 'द्रुतवाचन : गरज आणि उपाय', 'द्रुतवाचन आणि नियमांनुसार लेखन' यांच्या जोडीला 'आपली लिपी + जोडाक्षरांविषयी' असे एकूण तीन निबंध आहेत. वाचनाची सुरुवात द्रुतवाचनाच्या दिशेने विकसित करायची असेल तर 'आधी वाक्य आणि नंतर शब्द ओळखण्याची गती वाढवीत न्यावी' हा लेखकाचा विचार आधुनिक मानसशास्त्राच्या कसोट्यांवर आधारित आहे असा लेखकाचा दावा आहे. या निबंधातले पालकांसाठी असलेले काही विचार खरोखर मननीय आहेत.

'लेखन म्हणजे दृष्टिगम्य अर्थवाहक संकेत' अशी व्याख्या करून लेखकाने चिनी लिपी आदर्श ठरविली आहे. परंतु १९५६ साली शिक्षणप्रसाराच्या हेतूने तिच्यात एकवाक्यता आणण्यासाठी रोमन लिपीचा आधार घेतला गेला होता. मराठीसाठी देवनागरी लिपी स्वीकारण्यात येणाऱ्या अडचणींचा उल्लेख श्री. मोहनींनी केला आहे. (पृ.१७) परंतु भाषेतील प्रत्येक उच्चारासाठी स्वतंत्र लिपिचिन्ह असणे हे एक मिथक आहे. प्रत्यक्षात कोणतीही भाषा या दृष्टीने परिपूर्ण नाही. त्यासाठी तर आंतरराष्ट्रीय ध्वनिलिपीची गरज पडते. मात्र संस्कृतीमधील 'ष' मराठी उच्चारणात नाही हे मान्य केल्याबद्दल (पृ. १७) श्री. मोहनींचे अभिनंदन करायला हवे. (संस्कृताभिमानी मराठी भाषक हे कबूल करीत नाहीत.)

विचारातली ही लवचिकता, तत्सम शब्द, जुने शुद्धलेखन यांच्याविषयी मात्र लेखक दाखवीत नाही. अनुच्चारित, अनावश्यक अनुस्वार का काढले गेले याची भरपूर चर्चा पूर्वी झालेली असल्यामुळे या कैपक्षींशी पुन्हा वाद उकरून काढण्यात अर्थ नाही. तसेच मुद्रणाच्या संदर्भात इंग्लिश टाइपांचे केलेले विवेचन (पृ.२१-२२) मराठीला लागू पडत नाही. तिरपा टाईप मराठीत आहे; शिवाय अक्षरलेखन आणि छपाईचे चांगले प्रयोग मराठीत झालेले दिसतात.

'आपली लिपी' या तिसऱ्या निबंधाच्या दोन्ही भागांमध्ये आलेले विवेचन भाषाविज्ञानात स्वीकारार्ह ठरणार नाही. उदाहरणार्थ मराठीत ॲ, ऑ या परकीय स्वरांसह एकूण स्वरचिन्हांची संख्या १३ आहे. मोहनी म्हणतात त्याप्रमाणे आ हे अ चे दीर्घ किंवा दुप्पट उच्चार दाखवणारे स्वरचिन्ह नाही. (पृ. २५) दीर्घ ऋ, ऌ, अनुस्वाराऐवजी चंद्रबिंदी यांच्यासह ही स्वरसंख्या लेखकाच्या मते १७ आहे. नागरी व्यंजनवर्णातील 'अ'पणाचा स्वरांश आणि व्यंजनांश अट्टाहासाने वेगळा दाखवताना छ, द, र, ह (पृ. ३०) यांचे लेखन अतर्क्य आणि अव्यवहार्य झाले आहे इकडे त्यांचे लक्ष गेलेले दिसत नाही. बाराखडीत र नंतर पुन्हा ्र हे अक्षर कोणते हु/हू चे लेखन हु/हू करण्यामागचा हेतू काय, ऋ च्या बाराखडीतील ङृ,ञृ, ळृ अशी अक्षरे कुठे येतात, मराठीत अस्तित्वातच नसलेल्य दीर्घ ॠ चा समावेश बाराखडीत सर्वत्र कशासाठी या प्रश्नांची उत्तरे इथे मिळत नाहीत. यानिमित्ताने एक गोष्ट नोंदवावीशी वाटते ती अशी की, रु आणि रू हे केवळ लेखनामुळे घोटाळ्यात टाकणारे उकार रु / रू असे लिहावेत म्हणजे उकारांच्या लेखनात एकवाक्यता येईल ही सूचना कोणी करीत नाही. (याचा जरूर विचार व्हावा.)

श्री. मोहनींनी जोडाक्षरांविषयी केलेले विवेचन संकल्पनांपासून उदाहरणापर्यंत संस्कृतप्रचुर आहे. खण्डितस्वरदण्डयुक्त हा गट, दृश्-क्रुध्,-धिक्-ध्वंस् हे शब्द एकाक्षरी मानणे, मराठीत अनुस्वारयुक्त लेखन असूनही परसवर्णयुक्त लेखन करणे, कट्वाम्ल, कात्स्न्र्यम् अशी उदाहरणे पाहून मराठी भाषेचे प्रेमीसुद्धा तिच्या लेखनापासून दूर पळतील.

श्री. मोहनी यांनी केलेले 'र' युक्त जोडाक्षरांचे विवेचन तर्कशुद्ध नाही. (पृ.४२) ॅ / ॖ ही व्यंजनापूर्वी येणारी आणि ॣ / ॢ / ^ ही व्यंजनाला नंतर जोडली जाणारी र ची चिन्हे असूनही ॖ हा ^ चाच भाग आहे असे म्हणणे पटणारे नाही. तसेच मधला डावा भाग व्यंजन र चा आणि उजवा भाग अ चा द्योतक म्हणणे याला आधार काय ? प्रस्तुत पुस्तकात जोडाक्षरांच्या छपाईसाठी एक नवाच मार्ग अवलंबला आहे. जोडाक्षरातील व्यंजने क्रमानुसार एकाखाली एक लिहिल्यामुळे अक्षरांचे

तुकडे गिचमिड दिसून अक्षरांच्या आकारातील सौष्ठव नष्ट होते. उजव्या दिशेने लिहिली जाणारी ही लिपी वरून खाली जोडल्याने लेखनातील सुगमतेची आणि सौंदर्याची हानी होते ती निराळीच.

मराठीचे व्याकरण असो की शुद्धलेखन - हा अनेकांना आपल्याा अखत्यारीतला विषय वाटतो. परंतु याबद्दल लिहिताना संस्कृतपासून सुट्या झाल्याला या भाषेला कितीशे वर्षे झाली याचा कोणी विचार करत नाही. मराठीचे मराठी म्हणून, केवळ मराठी उदाहरणांसह विवेचन का होत नाही ? खरे तर मराठीला तिच्या आजीपणजीची वेशभूषा, केशभूषा इतकेच काय, औषधपाणीही करणाऱ्या या हितचिंतकांपासून वाचवा असे म्हणायची वेळ आली आहे. ■

**पश्चिम विभाग भाषा केंद्र, डेक्कन महाविद्यालय परिसर, पुणे**

## वृत्तपत्रे आणि परिभाषानिर्मिती

'केसरी' वृत्तपत्राला पन्नास वर्षे झाल्याच्या निमित्ताने 'केसरी मराठा संस्थे'ने 'केसरी प्रबोध' हा श्री.म. माटे संपादित ग्रंथ प्रकाशित केला. त्यात श्री. आबा चांदोरकर या ज्येष्ठ इतिहास संशोधकाने 'केसरी'ने प्रसृत केलेली भाषा' हा लेख लिहिला आहे. त्यात सुमारे तीन हजार शब्दांपैकी हजार-दीड हजार शब्दांची सूची दिली आहे. (१) अर्थउद्योग, (२) कायदेमंडळ, (३) भाषा व संस्कृती, (४) राजकीय घडामोडी, (५) व्यापार, (६) शास्त्रीय शोध, (७) कला व क्रीडा, (८) वृत्तपत्रे, (९) सामाजिक प्रश्न, (१०) शेती व ग्रामसंस्था अशा दहा प्रमुख क्षेत्रांत कोणकोणते नवे शब्द 'केसरी'ने रूढ केले वा प्रसारात आणले त्यांची नोंद केली आहे. अगदी ढोबळ उदाहरण म्हणून काही शब्द पाहा : 'अंदाजपत्रक', 'दडपशाही', 'नोकरशाही', 'चातकवृत्ती', 'चतु:सुत्री', 'स्वयंशासित', 'लेखणी हाक्ये', 'शीर्षक', 'सदर', 'वार्ताहार', 'स्थानिक', 'ज्ञानाचा खंदक', सरकार नियुक्त 'धनोत्पादक शिक्षण', 'प्रतिवृत्त', 'खर्डा', 'प्रांतिक मंडळे', 'नाणे', 'महागाई', 'गणसंख्या', 'श्रमसंयोग' इत्यादी.

चांदोरकर यांच्या या लेखाचा निर्देश मुद्दाम करण्याचे कारण वृत्तपत्रे नवी भाषा, परिभाषा घडवू शकतात याचा हा पुरावा आहे. वृत्तपत्रांना रोजच्या रोज भाषा घडवावीच लागते. त्या शब्दांच्या आधारे परिभाषा कोश तयार केल्यास भाषांतर व लेखन यातील काही अडचणी व त्यातून होणाऱ्या चुका कमी करता येतील.

'वृत्तपत्रे भाषा घडतात की बिघडवतात', प्रसन्नकुमार अकलूजकर,
'ललित' दिवाळी २००५, पृ. १४२.

**पुस्तक-परीक्षण**

# नव्या बाटलीमध्ये जुनी दारू

**मॅक्सीन बर्नसन**

[परीक्षित पुस्तक : 'ॲन इण्टेन्सिव्ह कोर्स रीडर इन मराठी' - विजया चिटणीस, रिव्हाइज्ड बाय सुमन बेलवलकर, सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लँग्वेजिज्, मैसूर, २००४, किंमत रु. २५०/-]

डॉ. विजया चिटणीस यांनी १९७९ साली लिहिलेल्या 'ॲन इण्टेन्सिव्ह कोर्स इन मराठी' या पुस्तकाची ही संक्षिप्त व सुधारित आवृत्ती आहे. संपादन करण्याचे काम डॉ. सुमन बेलवलकर यांनी केले.

डॉ. चिटणीस या त्यांच्या अकाली निधनापर्यंत डेक्कन कॉलेज, पुणे येथील पश्चिम विभागीय भाषा केंद्राच्या प्राचार्य होत्या. सध्या तेथे डॉ. बेलवलकर प्राचार्य आहेत. या पुस्तकाची पहिली आवृत्ती व नवीन आवृत्ती भारतीय भाषा संस्थानने प्रकाशित केली आहे. केंद्रीय शासनाच्या त्रिभाषासूत्रानुसार शिक्षकांना परप्रांतीय भाषा शिकवता याव्यात म्हणून त्यांना प्रशिक्षण देणे हा केंद्राचा मुख्य हेतू आहे. डॉ.चिटणीस यांनी मूळ पुस्तक त्या दृष्टिकोणातून लिहिले होते व सुधारित आवृत्तीही त्या कामासाठीच तयार केली आहे.

१९७९ साली जेव्हा मूळ पुस्तक लिहिले गेले तेव्हा परभाषा शिकविण्यासाठी रचानात्मक पद्धती (स्ट्रक्चरल मेथड) प्रचलित होती.या पुस्तकाच्या प्रस्तावनेमध्ये लेखिकेने असे लिहिले आहे की देशभर सर्व विभागीय भाषा केंद्रांना शैक्षणिक साहित्याठी संस्थानने एक सर्वसाधारण ढाचा दिला होता. त्या ढाच्यामध्ये रचनात्मक पद्धती अभिप्रेत होती, असे गृहीत धरायला हरकत नाही.

पुस्तक लिहीत असताना डॉ. चिटणीस यांनी ही रचनात्मक पद्धती काटेकोरपणे पाळली होती. प्रत्येक धड्यामध्ये एकच वाक्यरचना अथवा व्याकरणाचा मुद्दा धरून पूर्ण पुस्तकाची मांडणी केली. शिवाय, लिंग व एकवचन-अनेकवचन यांमधील फरक दाखविण्यासाठी 'हा वर्ग आहे', 'हे वर्ग आहेत', 'ही खोली आहे', 'या खोल्या आहेत', 'हे घर आहे', 'ही घरे आहेत' या प्रत्येक उपरचनेला स्वतंत्र प्रकरण दिले.



अनुक्रमणिका

यामुळे आशयाची मांडणी अत्यंत संथगतीची व रुक्ष वाटते. खुद्द डॉ. चिटणीस यांनाही याची जाणीव होती, असे दिसते. कारण प्रस्तावनेमध्ये त्यांनी लिहिले आहे की :

Thus one lesson broadly gives one teaching point at a time. The mother tongue readers may perhaps find the lesson somewhat contrived and dull... But this artificiality is bound to be there in teaching inflectional languages like Marathi. One may be tempted to start a lesson with नमस्कार! तुमचं नाव काय? 'Namaskar! What is your name ?' because it looks very attractive and students may recite the first lesson like a parrot beginning with 'माझं नाव मोहन' 'My name is Mohan ! But in languages like Marathi, where there are three genders, variable possessive adjectives, agreement between the variable adjective and noun, subject, objective and verb, and the oblique forms of the nouns etc. and the time at the disposal of the teacher is limited, it is not helpful to start with this kind of lessons. The material producer has to control himself in preparing the lessons and he should go step by step.

पंचवीस वर्षांपूर्वी अशी भूमिका घेणे समजण्यासारखे होते. आज मात्र परभाषा शिकविण्यासाठी कोणत्याही एकाच पद्धतीऐवजी एका पुस्तकात वेगवेगळ्या पद्धतींचा वापर करणे जास्त उपयुक्त आहे असे मानले जाते. सुरवातीपासून शक्य तितकी नैसर्गिक भाषेची ओळख विद्यार्थ्यांना करून दिली तर ते लवकर अर्थपूर्ण भाषा शिकायला लागतात, असा अनुभव आहे. व्याकरण व वाक्यरचना पद्धतशीरपणे, क्रमाक्रमाने जरूर शिकवावी. मात्र व्याकरणाचा एखादा मुद्दा स्पष्ट केल्याशिवाय त्याचा वापर करू नये असा अट्टाहास धरण्याची गरज नाही. काही वाक्ये अगोदर पाठ केली व नंतर त्यांचे व्याकरणाच्या दृष्टीने विश्लेषण केले तरी काही बिघडत नाही. (काही वर्षांपूर्वी मराठी शिकणाऱ्या एका अमेरिकन विद्यार्थीनीने मला सांगितले होते की, '' 'मी कर्वे रोड चर्चच्या मागे राहते' हे वाक्य सुरुवातीला मी नुसते पाठ केले होते. मग काही महिन्यांनंतर सामान्यरूपाची संकल्पना वर्गात शिकले.'')

**व्याकरण शिकविण्याची पद्धती**

संपूर्ण पुस्तक व्याकरण व वाक्यरचनांवर केंद्रित असले तरी व्याकरण शिकविण्याची पद्धती समाधानकारक वाटत नाही. एक तर पुनरुच्चारावर फारच भर देण्यात आला आहे. ठरावीक संवाद जसाचा तसा पुन:पुन्हा म्हणणे ही खरोखरच

पोपटपंची आहे. विद्यार्थ्याला एखादा मुद्दा समजून स्वत:च्या कल्पनेप्रमाणे त्यात थोडा बदल करायला फारसा वाव मिळत नाही. (अर्थात पश्चिम विभागीय भाषा केंद्राच्या अभ्यासक्रमामध्ये रोजच्या साडेपाच तासांच्या शिकवण्यामध्ये संभाषणासाठी वेगळा वेळ दिला आहे. त्यासाठी वेगळे साहित्य तयार केले आहे की काय, हे माहीत नाही.)

आणखी एक असमाधानकारक गोष्ट म्हणजे व्याकरणाचे स्पष्टीकरण. काही वेळेस ते फार त्रोटक व समजायला कठीण असते. याचे कारण म्हणजे विद्यार्थ्यांना काय माहीत आहे, काय नवीन आहे, हे डोळ्यासमोर ठेवून लिहिलेले नाही. उदाहरणार्थ, भूतकाळाबद्दलचे टिपण पाहा.

## Grammatical Notes

**General Remarks :**

Unit - XIV introduces the Past Tense.

Marathi verbs may be divided into three classes.

(1) Conjugational
(2) Non-conjugational
(3) Neutral

How is Past Tense Formed ?

(1) Base + tense marker ल + person, gender number suffix
(2) Base + tense marker ल + gender, number suffix
(3) Base + tense marker ल + neutral singular suffix

What is a base ?

A base is the form of the root before the tense marker , In most cases the base form is identical with the root form. In about twenty cases only there is partial or complete modification in the root form.

Unit - XIV - Lesson 42 explains the category of verbs, called Conjugational verbs having a direct subject only.

Conjugational verbs are those which agree with the direct subjcet in person, number and gender.

Below is an example of a regular Conjugational verb of the type DS + V :

(त्यानंतर बस- व हो- ही क्रियापदे भूतकाळामध्ये चालवून दाखवली आहेत.)

प्रथम हे टिपण पाहात असताना असे लक्षात येते की, मांडणीमुळे विद्यार्थी

बुचकळ्यात पडण्याची शक्यता आहे. हे टिपण युनिट मध्येच आहे म्हणून ''युनिट XII'' म्हणण्याऐवजी ''या युनिटमध्ये'' असे म्हटले असते तर जास्त स्पष्ट झाले असते. शिवाय 'How is past tense formed ?' या शीर्षकाखाली जे तीन मुद्दे आहेत ते अनुक्रमे वरच्या तीन प्रकारांना लागू आहेत. हे कदाचित विद्यार्थ्यांच्या लक्षात पटकन येणार नाही. मग 'base' व 'root' हे शब्द प्रचलित अर्थाप्रमाणे वापरलेले नाहीत. इथे ज्याला 'root' म्हटले आहे त्याला 'base' म्हणायला पाहिजे होते व ज्याला 'base' म्हटले आहे, त्याला 'stem' म्हणायला हवे होते.

भाषाशास्त्रीय परिभाषेद्दल एकवाक्यता पुषकळशी नसते हे खरे; पण शक्य तेव्हा प्रचलित परिभाषा वापरली तर बरी असते.

मांडणी व परिभाषा सोडाच. जास्त महत्त्वाचा प्रश्न म्हणजे भूतकाळाबद्दल कोणत्या गोष्टी विद्यार्थ्यांच्या निर्दशनाला आणायला पाहिजेत ? एक म्हणजे भूतकाळामध्ये क्रियापदांची रूपे अनियमित असतात. (म्हणजे त्यांचे stems अनियमित असतात.) दुसरे म्हणजे अकर्मक क्रियापदे भूतकाळामध्येही नेहमीप्रमाणे चालतात. (बोल-, शिक-, पि-, भेट- वगैरे अशी मोजकी सकर्मक क्रियापदे अकर्मक क्रियापदांसारखी कर्त्याप्रमाणे चालतात.) ज्या क्रियापदांना चिटणीस 'neutral' म्हणतात (मी 'impersonal' असे म्हणेन) त्यांना सर्व काळांमध्ये स्वतंत्र नियम लागू असतो, 'मला देऊळ आवडलं, मला देवळं आवडतात, मला करमलं, मला करमतं', इत्यादी. हे विश्लेषण बरोबर असेल तर conjugational व non-conjugational क्रियापदे, असे वर्गीकरण करण्याची गरज नव्हती.

आणखी एक गोष्ट म्हणजे विद्यार्थ्यांना स्वत:च्या भाषेचा किंवा दुसऱ्या माहीत असलेल्या भारतीय भाषेचा उल्लेख करता येईल. सकर्मक क्रियापदे कर्माप्रमाणे चालतात हे सांगत असताना हिंदीचे उदाहरण देता येईल - 'मैंने काम किया'. तेलगूसारख्या भाषेमध्ये हे होत नाही, हेही सांगता येईल.

केवळ व्याकरणाच्या बाबतीत नव्हे; पण एकूण पुस्तक वापरणारे विद्यार्थी ही प्रौढ भारतीय माणसे आहेत, हे डोळ्यासमोर ठेवून पुस्तक लिहायला हवे होते. त्या लोकांचे ज्ञान, अनुभव, तसेच वय, आवडी-निवडी लक्षात ठेवल्या असत्या तर पुस्तक जास्त जिवंत व समृद्ध झाले असते. प्रौढ माणसांना अनुकूल असे काही धडे असले तरी प्राणी, पक्षी, एकूण लहान मुलांना ज्यात रस वाटेल असे अनेक विषय घेतले आहेत. संपादन करीत असताना डॉ. बेलवलकरांना जाणवले असावे; कारण 'पुणे विद्यापीठ' हा धडा त्यांनी घातला आहे व काही ठिकाणी प्राणी, पक्ष्यांची उदाहरणे कमी केली आहेत.

संपादनाच्या बाबतीत पहिल्या आवृत्तीपेक्षा नवीन आवृत्तीची अनुक्रमणिका जास्त व्यवस्थित आहे. ती चाळून पुस्तकाचा आराखडा व प्रत्येक युनिटमधला आशय सहज लक्षात येतो. मात्र इंग्रजी मजकुरामध्ये असंख्य चुका आहेत - स्पेलिंग, शब्दार्थ व वाक्यरचना. काही चुका मूळ पुस्तकामध्ये होत्या; पण अनेक चुका केवळ नव्या आवृत्तीमध्ये झालेल्या आहेत.

Mohan likes the seen very much.
Mummy, there is a great fun wondering on the hill.
I say, bhajiwale, how do you sell potatoes ?
We were seeing the picture while eating pods.
The children tell the funs in the school.

हे पुस्तक केंद्र सरकारच्या प्रतिष्ठित संस्थेचे प्रकाशन असल्यामुळे मराठीबरोबर इंग्रजीचा मजकूर बिनचूक व्हावा म्हणून जास्त काळजी घ्यायला हवी होती. ही जबाबदारी केवळ संपादकांची आणि एका सहकाऱ्याची नव्हती. खास इंग्रजी मजकूर तपासण्यासाठी आणखी एक-दोन तज्ज्ञ माणसे हवी होती.

मुद्रणकलेच्या दृष्टीने पुस्तकाचा दर्जा संमिश्र आहे. आकार चांगला मोठा (डबल क्राऊन) व बाइंडिंग, कागद उत्कृष्ट आहे. मात्र टाइप आणि संमिश्र लेआऊटबद्दल जास्त विचार करायला पाहिजे होता. देवनागरी लिपीचा फॉण्ट सुंदर आहे, पण तो थोडा लहान केला असता तर आणखी मजकूर पानावर मावला असता. ठळक अक्षरांचा (boldface) वापर विनाकारण जास्त केला आहे. रोमन लिपीचा फॉण्ट साइज फार मोठा वाटतो.

हे परीक्षण लिहिताना मी केलेली टीका डॉ. सुमन बेलवलकर यांच्यावर नाही. त्यांच्यावर कालबाह्य पुस्तकाची संक्षिप्त व सुधारित आवृत्ती काढण्याची जबाबदारी टाकण्यात आली होती. माझ्या मते तेच चुकले आहे. सध्या इंग्रजी माध्यमामुळे सर्व भारतीय भाषा हटत चालल्या आहेत. बदलत्या परिस्थितीमध्ये त्रिभाषासूत्राचे पुनरुज्जीवन होण्याची अत्यंत गरज आहे. त्यासाठी भाषेसंबंधी काम करण्याऱ्या सर्व संस्थांनी - CIIL, NCERT - आधुनिक भाषाशिक्षण-विचाराच्या आधारे पूर्णपणे नवीन, ताजे साहित्य तयार करण्याची आवश्यकता आहे. नव्या बाटल्यांमध्ये जुनी दारू घालून चालणार नाही.

■

टपाल पेटी क्र. ६३, फलटण (जि. सातारा) ४१५ ५२३.

## शंका...

मो. वि. भाटवडेकर

**या संख्यांना नावे आहेत का ?**

**अभिनव मराठी - मराठी शब्दकोश** : संपादक - द.ह. अग्निहोत्री या कोशाच्या पाचव्या भागात शेवटी संख्यांची नांवे व मूल्ये दिली आहेत. त्यात शेवटची संख्या परार्ध असून ती एकावर अठरा शून्य देऊन दिली अहे. तसेच अक्षौहिणी (खंड १, पृ. १७६) या शब्दाचा अर्थ देताना 'एकावर एकवीस शून्ये' असा दिला आहे. तेव्हा शंका अशी की एकावर १९ शून्ये व एकावर २० शून्ये या दोन संख्यांची नावे काय ?

माझ्या परीने मी गेले दोन-तीन वर्षे याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला तरी यश आले नाही. आपण किंवा आपल्या वाचकांपैकी कोणी ही माहिती पुरवल्यास मी आभारी होईन. ■

**३, चैत्राली अपार्टमेंट, प्रभात रोड, ७वी गल्ली, पुणे ४११ ००४.**

**हवी शिक्षकांची फौज !**

आपल्यासारख्या विविध संस्थांनी एकत्र येऊन शिक्षणाच्या एका टप्प्यावरच्या आपली मातृभाषा असणाऱ्या मराठी या महत्त्वपूर्ण विषयाची दुरवस्था प्रत्यक्षात कशामुळे होते आहे, हे पाहणे जितके आवश्यक, तितकेच शिक्षणाच्या प्रत्येक स्तरावर व विशेषत: प्राथमिक स्तरावर होणारे मराठीचे आजचे अध्ययन-अध्यापन इतके निकस, नि:सत्त्व ज्या ज्यामुळे होते, त्या सर्व बाबी आपल्या शक्तीनुसार निपटून काढल्या पाहिजेत. म्हणूनच गेले काही महिने आम्ही म्हणत आहोत की, 'संपूर्ण महाराष्ट्रात प्राथमिक स्तरावर अध्यापनकुशल, व्यासंगी, जिज्ञासू आणि प्रामाणिक अशा शंभर शिक्षकांची फौज आपण तयार करू या !'

**प्रा. लीला पाटील**, (मराठी विभाग, पुणे विद्यापीठ यांच्या पुढाकाराने झालेल्या चर्चसत्रातील बीजभाषणात केलेले आवाहन)









## ...आणि समाधान

डॉ. अशोक रा. केळकर

संदर्भ : 'दुर्मिळ' की 'दुर्मीळ ?' 'भाषा आणि जीवन', २३:४ (दिवाळी)

(१) दाते आणि कर्वे संपादित 'महाराष्ट्र शब्दकोश'मध्ये 'दुर्मि(र्मी)ळ - ल' अशी नोंद आहे. म्हणजे त्यांना 'दुर्मिल, दुर्मिळ, दुर्मीळ, दुर्मील' अशी चारी रूपं आढळली असावीत. आज तरी यातील दुसरं आणि तिसरं रूप एवढीच आढळतात. (जाता जाता सांगायचं तर हिंदी कोशात 'दुर्मिल' एवढंच रूप सापडतं, संस्कृत कोशात कोणतंच सापडत नाही.)

हे कसं काय ? संस्कृतमध्ये 'दुर्मिळ' हे 'दुर्लभ', 'दुर्गम' यांच्या वजनावर बेतलेलं रूप घडवता येईल आणि कदाचित शोध घेतला तर आढळेल देखील. संस्कृत व्याकरणानुसार त्याची घडण अवघड या अर्थी दुर्, मिळणं, जुळणं या अर्थी मिल्, -णारा या अर्थी - अ अशी मांडता येईल. संस्कृतमधून मराठीत आलेल्या किंवा आणलेल्या शब्दांवर मराठी उच्चारणाची छाप पडणं स्वाभाविक आहे. तशी ती पडली म्हणजे शेवटचा अ अनुच्चारित राहील, शेवटच्या अक्षरात अ, इ, उ यांपैकी स्वर आणि नंतर एकेरी व्यंजन अशी रचना असली तर तो स्वर दीर्घ होईल, आणि शब्दाच्या आरंभी नसलेला ल् हा ळ् होईल. (या ठिकाणी अक्षर ही संज्ञा वर्ण या अर्थी वापरली नसून पद्यरचनेचा विचार करताना वापरतो तशी सिलबल् या अर्थी वापरलेली आहे.) काही उदाहरणं घेऊ. 'मन'चा उच्चार लघुलघु ऐवजी गुरु एवढाच. 'स्मित'चा सामान्य उच्चार लघुलघु ऐवजी गुरु. 'कोमल'चा उच्चार कोमळ असा. उच्चारण आणि लेखन यांच्या दरम्यानची तफावत दूर करण्याची मराठी भाषकांची धडपड असते, मात्र ती कमी अधिक सफल ठरते. (जाता जाता सांगायचं तर इंग्रजीत night ऐवजी nite लिहिण्याची काहीनी टूम काढली, पण ती टूमच राहिली. इंग्रजी भाषक या बाबतीत एकंदरीने गाफीलच म्हणायचे.) प्रौढ संदर्भात 'गुण' लिहायचं, लघुलघु उच्चारायचं (उदाहरणार्थ, निर्गुण, गुण गाईन, गुण आणि धर्म), सामान्य संदर्भात 'गूण' लिहायचं, दीर्घ उच्चारायचं (उदाहरणार्थ, पायगूण, औषधाचा गूण आला, गूण उधळले) अशी दक्षता काहीजण दाखवतात; काहीजण लेखन 'गुण' आणि उच्चार दीर्घ असं पतकरतात, काहीजण ग्राह्य कोणतं आणि क्षम्य कोणतं असा

विवेक करतात. एवढं असलं तरी काही निश्चित धोरणंही दिसतात. कुळाचार/कुलाचार, कुळकरणी/कुलकरणी/तिलतंडुलन्यायाने, तिळगुळाचे लाडू, तिळाचे लाडू, गालावरचा तीळ, वकील आणि कूळ, वकील आणि कुळं असे प्रयोग दिसतात, या उदाहरणांत इ/ई, उ/ऊ, ल/ळ भेद पाळले जातात, अनुच्चारित अ लेखनात पायमोड करून कधीच दाखवला जात नाही. ('आणि' या अर्थी अन् लिहितात ते केवळ गैरसमजापोटी - 'आत अन बाहेर', 'कण अन कण' लिहायला काहीच हरकत नाही.) म्हणजे दुर्मीळ ग्राह्य, दुर्मिळ क्षम्य, दुर्मिल ग्राह्य पण अतिप्रौढ, दुर्मील त्याज्य.

(२) दाते-कर्वे कोशात 'ठरीव, ठराविक' अशी नोंद आहे. (इथून पुढे 'ठरीव'चा विचार करायचं कारण नाही.) मोरो केशव दामल्यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरण'मध्ये तीन छेदक आहेत : ४०१ ('पढीक'मधला मराठी-ईक प्रत्यय), ४०२ ('मोकळीक'मधला मराठी-ईक प्रत्यय), ३९९ ('धनिक'मधला संस्कृत-ईक प्रत्यय) (दामल्यांच्या व्याकरणाची कोणतीही आवृत्ती हाताशी असू दे : छेदकांचे आकडे तेच, तेव्हा पृष्ठांक द्यायची गरज नाही - जे आवृत्तीला अनुसरून बदलतात.)

४०१मधला प्रत्यय साधारणतः क्रियापदाला लागून अविकारी विशेषणे बनतात 'णारा' या अर्थी (खर्चीक, सोशीक), 'लेला' या अर्थी (पढीक, हातसडीक), 'युक्त' या अर्थी (पाल्हाळीक).

४०२मधला प्रत्यय साधारणतः विशेषणाला किंवा नामाला लागून स्त्रीलिंगी नामे बनतात. 'पणा' या अर्थी (मोकळीक, कोवळीक, सोयरीक, जवळीक; तिडीक - तिडीक म्हणजे दुःखदायक तिडलेपणा).

३९९मधला प्रत्यय साधारणतः संस्कृत नामाला लागून अविकारी विशेषणे बनतात. 'चा' या ऐसपेस अर्थी; याप्रमाणे बनलेल्या शब्दाच्या पहिल्या अक्षरातील स्वराची काही प्रसंगी 'वृद्धी' होते (धनिक, रसिक, भाषिक, श्रमिक; वृद्धी करून : सामाजिक, वार्षिक, धार्मिक, पारंपरिक, वैश्विक, ऐतिहासिक, मौखिक, भौतिक, वैदिक, लौकिक - अनुक्रमे समाज, वर्ष, धर्म, परंपरा, विश्व, इतिहास, मुख, भूत, वेद, लोक या नामांपासून)

'ठरावीक' शब्द छेदक ४०१मध्ये सुखाने बसतो, ४०२ किंवा ३९९मध्ये नाही. (जाता जाता सांगायचं म्हणजे 'मर्तीक' म्हणजे 'मृतक' या संस्कृतमधून आलेल्या शब्दाचं मराठी उच्चारण आहे. 'मेलेलं माणूस' या अर्थी नाही, केवळ 'मेलेल्या माणसाचं अशौच' या अर्थी, पुंल्लिंगी नाही, नपुंसकलिंगी. त्यात इथला कोणताच प्रत्यय नाही.)

सामान्यत:, भाषेत पदघटक जोडून पदं बनतात, पदं जाडून वाक्यघटक बनतात, आणि वाक्यघटक जोडून वाक्यं बनतात. मात्र कधीकधी होतं काय, तर वाक्यघटक थिजून पदं बनतात. उदाहरणार्थ, of the clock, do not, up to date थिजून o'clock, don't, uptodate बनतात.

आता ही मराठी वाक्यं पाहा :

तू मुलींना बाहेर जाऊ दे → मुलींना बाहेर जाऊदे(त)
तुम्ही मुलींना बाहेर जाऊ द्या → मुलींना बाहेर जाऊदे(त)
चल, आपण अभ्यास करू या → आपण अभ्यास करूया
चला, आपण अभ्यास करू या → आपण अभ्यास करूया(त)

पहिल्या आणि दुसऱ्या वाक्यात 'मुलींना' बहुवचनी म्हणून 'त' प्रत्यय जोडावासा वाटतो. चवथ्या वाक्यात 'तुम्ही' अध्याहृत म्हणून 'त' लावावासा वाटतो. ही थिजण्याची दुसरी पायरी. (हा 'तुम्ही' मानार्थी असेल किंवा नसेल.)

तू मुलींना बाहेर जाऊ देऊ नको(स) → मुलींना बाहेर नको जाऊदे.
तुम्ही मुलींना बाहेर जाऊ देऊ नका → मुलींना बाहेर नको जाऊद्या.
चल, आपण अभ्यास करायला नको → आपण अभ्यास करूया नको.
चला, आपण अभ्यास करायला नको → आपण अभ्यास करूया नको.

ज्याप्रमाणे o' आणि n't ही झिजलेली नाणी आहेत. त्याप्रमाणे उजवीकडल्या वाक्यांतून वाक्यघटकांची झिजवट नाणी दिसतात. मात्र यातली काही नाणी चलनात स्थिर झालेली आहेत, तर काही चलनात कमीअधिक स्थिर होऊ पाहात आहेत. पण दक्ष माणसाला ती झिजवट दिसतात.

म्हणजे, करू या ग्राह्य, करूया ग्राह्य, करूयात क्षम्य, करूया नको क्षम्य.

गोष्ट अशी आहे की वाक्यं जोडून वाक्यबंध बनतात तेव्हा आपण बऱ्यापैकी जागरूक असतो, वाक्यं बनताना कमी जागरूक असतो, वाक्यघटक बनताना आणखी कमी जागरूक असतो, पदं बनताना (विशेषत: चलनात रुळलेलं पद वापरताना) फारच कमी जागरूक असतो.

एक मात्र नक्की. भाषा कधीच पूर्ण थिजलेली नसते, ती कमीअधिक प्रवाही असते.

आतापर्यंतच्या चर्चेतून संस्कृतमधून घेतलेल्या शब्दांबद्दल काही सामान्य धोरणं आखता येतात. (१) मूळ संस्कृत रूपं नेहमीच ग्राह्य असतात; मात्र त्यातली काही रूपं कमी वापरात असतात. उदाहरणार्थ, तरुण, तरुणी, तारुण्य; कठिन, काठिन्य;

नवीन, नवीनता, नावीन्य; मलीन, मलीनता, मालीन्य; रूप, रूपांतर; गीत, गीता; स्मित, सस्मित; स्वीकार, स्वीय; क्रिया, सक्रिय; दीपावली. (२) त्यांचं उच्चारात मराठीकरण केलं तर पुरतेपणी करावं; मात्र मराठीकरणं किंवा काही तडजोडी त्याज्य ठरतात, फार तर क्षम्य ठरतात, ग्राह्य नाहीत. तरुणाई, तरुणपणी, तरणीताठी मुलगी (परंतु : तरूण); कठीण, कठीणपणा, काठिण्य (परंतु; कठिण कठिण किती पुरुषहृदय बाई - चालीसाठी क्षम्य); नवीनपणा (परंतु : नाविन्य; नविन हे मात्र त्याज्यच); मळीण, माळीणपणा (परंतु : मालिन्य); रुपडं (परंतु : रुप, रुपांतर त्याज्य); गीताई, गिता (मुलीचं नाव म्हणून क्षम्य); स्मितं (बहुवचनी) (परंतु : स्मीत त्याज्य); स्वता (स्विकार त्याज्य); किरवंत (परंतु : सक्रीय त्याज्य); दिवाळी, दिपवाळी (परंतु : दिपावली, दिपावळी त्याज्य). क्षम्य रूपं औपचारिक लेखनात किंवा वाङ्मयात सहसा वापरू नये. ■

**७, धनंजय, ७५९/८३, भांडारकर रस्ता, गल्ली क्र. ६, पुणे ४११ ००४.**

---

**लेखक परिचय**

- **डॉ. द.भि. कुलकर्णी** - पीएच्.डी. (मराठी), रशियन भाषेतील पदविका, नागपूर विद्यापीठातून मराठीचे प्रोफेसर व विभागप्रमुख म्हणून निवृत्त. एकतीस प्रकाशित ग्रंथ. पीएच्.डी.पदवीसाठी २५ विद्यार्थ्यांना मार्गदर्शन. अनेक पारितोषिके व सन्मानांचे मानकरी. मान्यवर शिक्षक.
- **शुभानन गांगल** - व्यापारी नौकानयन अधिकारी, 'लाटांच्या सावलीतून...' हा कवितासंग्रह प्रकाशित. पद्यातील विविध छंद, गेयता यांचा संगणकांच्या माध्यमातून शोध घेण्यात मग्न. त्यासंबंधीची तीन पुस्तके प्रकाशित.
- **डॉ. नीलिमा गुंडी** - (अंक २३:४, दिवाळी २००५ पाहावा)
- **डॉ. किसन पाटील** - प्रपाठक - मराठी विभाग, मु.जे.महाविद्यालय. प्र. अधिष्ठाता, कला विद्या शाखा, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव. भाषा आणि लोकसंस्कृती यांचे अभ्यासक.
- **डॉ. शिवाजी पाटील** - सातारा येथील छत्रपती शिवाजी महाविद्यालयात मराठीचे प्रपाठक.
- **डॉ. शैलेश सदाशिव पुंडलीक** : एम्.ए. (इंग्लिश). एम्.ए. व पीएच्.डी. (भाषाविज्ञान) सामाजिक भाषाविज्ञान शैलीविज्ञान, वाक्य व वाक्यार्थ विन्यास या विषयासंबंधी लेखन, श्री.ना.दा. ठाकरसी महिला विद्यापीठाच्या उपयोजित भाषाविज्ञान विभागात अध्यापन.
- **सुषमा पौडवाल** - एम्.ए.,एम्.लिब्. (मुंबई विद्यापीठ), श्री. ना. दा. ठाकरसी विद्यापीठाच्या जुहू तेथील शाखा ग्रंथालयात ग्रंथपाल. विंदा (गो.वि. करंदीकर) सूची, त्र्यं.शं. शेजवलकर सूची, विंदा (सहसंपादन), कोश व सूचीवाङ्मय (सहसंपादन) इ. ग्रंथ प्रकाशित. ग्रंथालयशास्त्रावर विविध नियतकालिकांत लेखन.
- **डॉ. मॅक्सीन बर्नसन** - (अंक २३:३, पावसाळा २००५ पाहावा)
- **डॉ. सुमन वासुदेव बेलवलकर** - (अंक २३:४, दिवाळी २००५ पाहावा)
- **शरदिनी मोहिते (बाबर)** - (अंक २३:४, दिवाळी २००५ पाहावा)

---

## परिषद वार्ता

(१) दि. १४ व १५ ऑक्टोबरला पुणे विद्यापीठ, मराठी विभाग, मराठी अभ्यास परिषद, दै. सकाळ, महाराष्ट्र राज्य मराठी विकास संस्था व प्रतिमा प्रकाशन यांच्या संयुक्त विद्यमाने एका चर्चासत्राचे आयोजन करण्यात आले. चर्चासत्राचा विषय होता : 'माध्यमिक व उच्च माध्यमिक परीक्षांमधील मराठी विषयाची दुरवस्था : कारणे आणि उपाय'

(२) मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे एक नियुक्त सदस्य प्रा. रमेश पानसे (पुणे) यांनी आपल्या पदाचा राजीनामा दिला आहे. त्यांच्या जागी श्रीमती विजया नंदकुमार चौधरी, पुणे यांची एका ठरावाद्वारे नियुक्ती करण्यात आली आहे.

(३) महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार २००५ (रु. ५०००/-) 'भयंकर सुंदर मराठी भाषा' लेखक डॉ. द.दि. पुंडे (मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, २००४) या पुस्तकाला देण्यात आला आहे. सुप्रिया सहस्रबुद्धे (निमंत्रक), विजया देव व अनघा भट यांनी पुरस्कारासाठी परीक्षक म्हणून काम पाहिले. पुरस्कार-वितरणाचा कार्यक्रम शनिवार दि. १७ डिसेंबर २००५ ला डॉ. अरुण टिकेकर यांच्या प्रमुख उपस्थितीत पार पडला.

(४) मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे एक स्वीकृत सभासद श्री. किसनराव बंडुआबा होळकर (वय ६६) यांचे बंगलोर येथे हृदयविकाराच्या झटक्याने १७ डिसेंबर रोजी निधन झाले. पाटबंधारे खात्यातून स्थापत्य अभियंता म्हणून ते निवृत्त झाले. कोयना व उजनी या धरणांच्या उभारणीत त्यांचा सहभाग होता. त्यांचा ग्रंथसंग्रह मोठा होता आणि अनेक सामाजिक संस्थांशी त्यांचा संबंध होता. परिषदेचे कार्यकारी मंडळ त्यांच्या कुटुंबीयांच्या दुःखात सहभागी आहे.

## भाषाविषयक लेखनाची सूची : २००५

[**टीप :** ही सूची परिपूर्ण करण्यासाठी वाचकांनी आपल्या वाचनात आलेल्या लेखांचे व पुस्तकांचे संदर्भ कळवावेत, अशी विनंती आहे. पूरकसूची पुढील अंकात येईल. - संपादक.]

**सुषमा पौडवाल**

### १. पुस्तके :

**अकलूजकर** विद्युल्लेखा/'शब्दवेध'/मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई/पृ.१८२/रु. १५० (शब्द व भाषाविषयक ललितलेखांचा संग्रह - १९९९ ते २००३ पर्यंत प्रकाशित झालेले 'साप्ताहिक सकाळ'मधील 'भाषावेध' सदरातील ४३ लेख संग्रहित.)

**जोगळेकर** गं.ना./'मराठी भाषेचा इतिहास' / श्रीविद्या प्रकाशन, पुणे/ पृ. २४०/ रु. २००. (मराठीच्या जनकभाषेचा वाद, उगम काल, विकासाचे टप्पे, अर्वाचीन काळातील रक्षणाचे प्रयत्न व आजचे स्वरूप ही प्रकरणे. मराठी विद्यापीठ स्थापनेची सूचना. मो.गो. धडफळे यांची प्रस्तावना.)

**पाटणकर** जयश्री (संपादन)/'सामाजिक भाषाविज्ञान : कक्षा आणि अभ्यास'/ ससंदर्भ प्रकाशन, नाशिक/पृ. ३२७/ रु. ३६०.

**बिनीवाले** अविनाश/'बोलु कवतिकें'/ राजहंस प्रकाशन, पुणे/पृ.९२/रु. ७०. (लोकसत्तेतील 'भाषा - आपली सर्वांचीच' या भाषाविषयक सदरातील त्रेपन्न लेखांचे पुनर्लेखन - भारतीय भाषा व संस्कृती संबंधी लेख.)

**बिनीवाले** अविनाश/'माय मरो पण...'/ राजहंस प्रकाशन, पुणे/पृ.९१/रु.७५. (प्रमुख भारतीय भाषांच्या सद्यः-स्थितीवरील एकोणीस लेख)

**मोहनी** दिवाकर/'माय मराठी : कशी लिहावी; कशी वाचवी'/लिपिरूपदा प्रकाशन, पुणे/पृ.४४/रु. ३०. ('द्रुतवाचन' गरज आणि उपाय, 'द्रुतवाचन आणि नियमानुसार लेखन' आणि 'आपली लिपी व जोडाक्षराविषयी' हे तीन निबंध.)

**लेले** वा.के./'भाषा : स्वरूप, सामर्थ्य व सौंदर्य'/राजहंस प्रकाशन, पुणे/पृ. १०२/ रु. ८०. (भारतीय भाषांची, त्यांच्या भाषिक, भौगोलिक व सांस्कृतिक वैशिष्ट्यांची तसेच आजच्या स्थितीची ओळख करून देणारे सात ललित लेख संग्रहित. प्रमुख साहाय्यक ग्रंथांची सूची.)

### २. पुस्तिका :

**गवांदे** राजाभाऊ/'संमेलनाचे उद्घाटक यांचे भाषण'/९वे कोकण मराठी संमेलन, ठाणे/७,८,९ जाने.२००५/ पृ. ८. (शहरातून चाललेली मराठीची गळचेपी सोदाहरण दाखवून मराठीला ज्ञानभाषा करण्याचे आग्रही प्रतिपादन करणारे भाषण.)

## ३. पुस्तक परिचय व पुस्तक परीक्षण

**आ**ल्हाड एकनाथ/'भाषाप्रेमी मंडळींसाठी एक पर्वणी'/लोकसत्ता 'लोकरंग' पुरवणी/२४ जुलै/ पृ.४

**कुं**टे राधिका/'भाषेच्या स्थित्यंतराचा आढावा'/लोकसत्ता 'लोकरंग' पुरवणी

**चि**टणीस वैशाली/'भाषेची चंमतगं'/लोकसत्ता 'लोकरंग' पुरवणी/८ मे/पृ.४

**भो**सले विशालाक्ष/'ऐतिहासिक काम' महाराष्ट्र टाइम्स, मुंबई टाइम्स पुरवणी/२७ फेब्रुवारी/पृ.३

**रा**णे संपदा/'सामाजिक भाषाविज्ञानाचा अभ्यास'/लोकसत्ता (लोकरंग पुरवणी)/७ ऑगस्ट/पृ. ४

**शा**स्त्री सुजय/'भाषेच्या मुळाचा शोध'/लोकसत्ता (लोकरंग पुरवणी)/२२ मे/पृ.४

**सा**मंत सत्त्वशीला/'माय मराठी'चा नागरी आविष्कार'/लोकसत्ता (लोकरंग पुरवणी)/१३ नोव्हेंबर/पृ. ४

## ४. नियतकालिकांतील लेख

**अ**कलूजकर प्रसन्नकुमार/'वृत्तपत्रे भाषा घडवितात की बिघडवितात ?'/ललित दिवाळी नोव्हें.-डिसें./पृ.१३५-१४२, १८९

**का**ळे दा.गो./'मराठीचे मारेकरी'/शब्दवेध २९ मे/ पृ. ३-६

**जो**गळेकर हेमंत गोविंद/'कवितेची भाषा'/अंतर्नाद/सप्टेंबर/पृ.३१-३४

**जो**शी अनिता/'राज्य मराठी विकास संस्था : एक तपाची वाटचाल'/लोकराज्य / ५ ऑगस्ट/पृ.२-५

**बि**नीवाले अविनाश/'मराठी भाषा आणि समाज'/लाजरी (दिवाळी)/पृ.७०-७४

**रा**जवाडे वि.का./'मराठी भाषा मुमूर्षु आहे काय?'/अंतर्नाद/एप्रिल/पृ.१३-२१

**रा**नडे मृण्मयी/'मराठीतील इंग्रजी'/अंतर्नाद/सप्टेंबर/पृ. ४५-४६

**शे**ख यास्मिन/'मराठी भाषेच्या सौष्ठवासाठी'/अंतर्नाद (दिवाळी)नोव्हेंबर.-डिसेंबर/पृ.९३-९५

## ५. दैनिकांतील लेख :

**कु**लकर्णी प्रल्हाद/'राजकारणातील भाषा'/लोकसत्ता, लोकमुद्रा पुरवणी, १२ जून/पृ. ४

**गो**खले मीना/ 'मायमराठीच्या अस्तित्वाचं अध्यक्षीय चिंतन'/लोकसत्ता (लोकरंग पुरवणी)/२३ जाने./पृ.३

**जो**शी आनंद/'विविध भाषा मरतात; पण का मरू नयेत?'/लोकसत्ता, (लोकमुद्रा पुरवणी)/ २९ मे / पृ.३

....., ...../'माझा इंग्लिश बोल कवतिके'/महाराष्ट्र टाइम्स, मुंबई टाइम्स पुरवणी/७ फेब्रुवारी/पृ.७

**दां**डेकर विश्वास/'भाषा आणि लिपी'/लोकसत्ता (लोकमुद्रा)/१२ जून/पृ.८

देशपांडे रेखा/ 'जिराकेच्या भाषेचा मृत्यू'/लोकसत्ता/२० मे/पृ. ५

भटेवरा सुरेश/'मराठी पाऊल अडते कुठे?'/ महाराष्ट्र टाइम्स, मुंबई टाइम्स पुरवणी/ २० फेब्रुवारी/पृ.१

साधू अरुण/'मराठी आणि महाराष्ट्र : अजून उशीर झालेला नाही!'/लोकसत्ता (लोकरंग पुरवणी)/२० नोव्हेंबर/पृ. १

## ६. टिपणे :

चंदावरकर मीना/'भाषा बोलताना....'/ लोकसत्ता, मुंबई वृत्तान्त पुरवणी/१५ जुलै/ पृ. ४

......, ........./ 'माध्यम ठरवताना'/ लोकसत्ता (मुंबई वृत्तान्त पुरवणी)/२० जाने./पृ.४

......, ........./ 'शब्दशास्त्र'/लोकसत्ता (मुंबई वृत्तान्त पुरवणी)/१४ जाने./ पृ.४

जोशी वंदना/ 'मराठी भाषेचा शिवाजी'/ लोकसत्ता (मुंबई वृत्तान्त पुरवणी)/२१ मे/पृ.५

देखणे रामचंद्र/'शब्द आणि अर्थ/लोकसत्ता (मुंबई वृत्तान्त पुरवणी)/२९ एप्रिल/ पृ.४

......, ........./'शब्दभावनेचे मूर्त रूप'/ लोकसत्ता (मुंबई वृत्तान्त पुरवणी)/२७ एप्रिल/पृ.५

......, ........./'शब्दज्योत'/लोकसत्ता (मुंबई वृत्तान्त पुरवणी)/२८ एप्रिल/ पृ.४

......, ........./'शब्दप्रमाण'/लोकसत्ता (मुंबई वृत्तान्त पुरवणी)/७ मे/पृ.५

......, ........./ 'शब्दपूजा'/लोकसत्ता (मुंबई वृत्तान्त पुरवणी)/१२ मे/पृ.४

......, ........./ 'शब्दांची व्याप्ती'/ लोकसत्ता (मुंबई वृत्तान्त पुरवणी)/२६ एप्रिल/पृ.४

......, ........./'शब्दांचे अर्थ'/लोकसत्ता (मुंबई वृत्तान्त पुरवणी)/११ मे/पृ.४

......, ........./'शब्दावरी माझा ठसा'/ लोकसत्ता (मुंबई वृत्तान्त पुरवणी)/३० एप्रिल/पृ.५

## ७. पत्रव्यवहार :

कर्णिक वामन/ 'पुस्तक प्रदर्शनात मराठी भाषादुमदुमली पाहिजे'/लोकसत्ता/२८ जानेवारी/पृ.६

कहाळेकर धुंडिराज/ 'वाढती अनास्था ध्योक्याची'/लोकसत्ता /१५ जुलै/पृ.६

गावडे ज्ञानेश्वर/'बोली भाषेचा स्वार्थी बाणा' लोकसत्ता/१५ जुलै/पृ.६

गोगटे म.ना./'देवनागरी लिपीत बदल हवेत'/लोकसत्ता/१५ जुलै/पृ.६

## ८. मुलाखती :

करपे शशी/'मराठीची पिछेहाट रोखण्यासाठी प्रयत्न हवेत - थेटथेट : प्रा. केशव मेश्राम'/महाराष्ट्र टाइम्स पुरवणी/२८ फेब्रुवारी/पृ.५

१२-ब, शततारका, चार बंगला, अंधेरी (प.), मुंबई ४०० ०५३.

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे.
वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५/-, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/-,
व्यक्तीला रु. १००/-, पंचवार्षिक वर्गणी रु. ४५०/-
परदेशात अंक पाठविण्यासाठी टपालखर्चासाठी रु. १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'भाषा आणि जीवन'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** (पाठवल्यास आपला पत्ता न विसरता लिहावा.) धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये २०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **मागील अंक :** 'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) काही अंकांचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/- आणि २००२ पासून प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-.

(५) **जाहिरातीसाठी नवे दर :**
पूर्ण पान रु. २,५००/-, अर्धेपान रु. १,५००/-, पाव पान रु.८००/-, शुभेच्छा सूचना रु. ४००/-, आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/-
जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**मुखपृष्ठासंबंधी :**

दृक्‌कलेच्या रचनेसाठी अत्यावश्यक असणारा एक घटक : आकार
या वर्षी मुखपृष्ठांसाठी वर्तुळ, त्रिकोण आणि चौरस या तीन मूलभूत आकारांच्या रचनेत लिपीचा अविभाज्य घटक असलेल्या अक्षराच्या उपयोजनातून साकारलेली संकल्पना वापरली आहे. या रचनेतील अक्षरे भारताच्या समृद्ध लिपीसंस्कृतीचे प्रतिनिधीत्व करणारी असून संपूर्णपणे संगणकसाह्याने घडलेली आहेत. प्राधान्य अर्थातच देवनागरीला असून अन्य रचनांमध्ये बंगाली, मल्याळम आणि गुजराती अक्षरांचा उपयोग केला आहे.

चित्रकल्पना व अक्षर-निर्मिती : विनय सायनेकर; दृश्य संकल्पना व संगणकसाहाय्य : सुप्रिया खारकर.

---

